# छापील संसार

( स्वतंत्र विनोदी नाटक )

लेखक

शंकर गोविंद साठे,

एल्.एल्. बी.

विजयादशमी ] किंमत १२ आणे [ शके १८६०

'**छापील संसार**' या नाटकाचा प्रथम प्रयोग 'नाट्य विकास मंदिर' या नाट्यसंस्थेनें सोमवार ता. ३ आक्टोबर १९३८ रोजी विजयादशमीचे सुमुहूर्तावर पुणे येथे विजयानंद थिएटरात रात्रौ ९॥ वाजता करून दाखविला.



## प्रथम प्रयोगांत पुढील नटनटींनीं कामें केलीं.

**धुरंधर :** श्री. द. न. वैशंपायन.
**महाबळ :** श्री राजा परांजपे
**सोपाना :** श्री. भागवत.
**भगवन्तराव :** श्री. वा. गो जोगळेकर

**भामिनी :** सौ. इंदिराबाई चिटणीस
**चंचला :** कु. ताराबाई.



**अंक १ ला :** सकाळी ८ चा सुमार; भगवंतरावांचें निवासस्थान.
**अंक २ रा :** पहिल्या अंकानंतर थोड्या वेळाने. स्थळ तेच.
**अंक ३ रा :** त्याच दिवशी सायंकाळी ५॥ वाजतां. स्थळ तेच.

---

सबंध कथानक १२ तासांत घडलेलें आहे.

# संसार थाटण्यापूर्वी—

'नाटयविकास मंदिर' या नवीनच स्थापन होणाऱ्या नाटयसंस्थेनें माझ्यासारख्या नवशिक्या लेखकाच्या नाटकानें आपल्या जीवनास प्रारंभ केला आहे. ही नाटयसंस्था नवीन असली तरी तिची सूत्रें नटवर्य श्री. केशवराव दाते यांजसारख्या, नाटयव्यवसायांतील दीर्घानुभवी व्यक्तीच्या हाती असल्यामुळें, संस्थेची बाल्यावस्था ही नांवापुरतीच आहे असें म्हणावयास हरकत नाही. माझें तसें नाही. हें माझें पहिलेंच नाटक—किंबहुना पहिलेंच लिखाण आहे.

संसार कसा करावा याचें स्त्रियांना उपजतच ज्ञान असतें. ते त्यांना कोठें शिकावें लागत नाही. संसार थाटला म्हणजे त्यांत थोडाफार थाटमाट, टापटीप, सौंदर्य यांची भर घालावी आणि आपल्या नेटक्या संसाराकडे पाहून इतरांनी काढलेले प्रशंसोद्‌गार चोहोंकडून आपल्या कानावर पडावे अशीहि स्त्रियांची मनांतून इच्छा असतेच; त्यासाठी मासिकांतून, वर्तमानपत्रांतून संसारविषयक जें जें वाङ्मय अलीकडे प्रसिद्ध होतें तें वाचून, त्यांतील उपयुक्त सूचना ताबडतोब अमलांत आणण्याचा गृहिणींनी प्रयत्न केला तर त्यांत आक्षेपार्ह काहीच नाही. पण, स्वतःची आवडनिवड, तारतम्य हें सर्व गुंडाळून ठेवून, छापून येणाऱ्या सरसकट संसार—वाङ्मयाला, वेदवाक्याचें महत्त्व दिलें म्हणजे संसाराचें प्रयोगशाळेंत कसें रूपांतर होतें याचें विनोदी चित्र रेखाटण्याचा मी प्रयत्न केला आहे. 'छापील संसारा'ची बैठक ही अशी आहे.

नाटकांतील बातमीदाराच्या पात्राविषयीं मला थोडा खुलासा करणें जरूर आहे. मराठी वृत्तपत्रव्यवसायाची आजची परिस्थिति एका बातमीदाराच्या तोंडून वदविण्यांत, बातमीदाराच्या पेशाची अगर वृत्तपत्राच्या धंद्याची मला थट्टा करावयाची आहे असा गैरसमज कोणी करून घेऊं नये. माझा मराठी वृत्तपत्रव्यवसायाशी अगदी जिव्हाळ्याचा संबंध आहे. त्या धंद्यात सध्यां दिसून येणारे कित्येक दोष ( की जे जबाबदारीच्या थोड्याशा

जास्त जाणिवेनें सहज सुधारता येतील असे) सुधारले जावे या सद्बुद्धीनेंच मी ते, पदरचा थोडा मीठ-मसाला घालून, भडक रगात दाखविले आहेत.

मी नाटक लिहीत असतां वेळोवेळी उपयुक्त सूचना करून व प्रयोगाच्या दृष्टीनें इष्ट फेरफार सुचवून श्री. केशवराव दाते यानी मला कायमचे उपकृत करून ठेवलें आहे. नाट्यतंत्राच्या बाबतीत त्यांच्याइतका शकाखोर गृहस्थ अद्याप माझ्या पाहण्यात आलेला नाही ! या त्याच्या स्वभावाचा मी भरपूर उपयोग करून घेतला आहे आता हे नाटक रगभूमीवर येत असल्यामुळे, श्री. दाते याच्या नाट्य–प्रवेशपरीक्षेतून मी पसार झालों आहे असे समजण्यास हरकत नाही.

नाटक रगभूमीवर आणण्याचे कामी सहकार्य केल्याबद्दल ‘ नाट्य विकास मदिर ’च्या नटवर्गाचे मी मन पूर्वक आभार मानतो. तसेच फारच थोड्या वेळांत सुबक फोटो काढून दिल्याबद्दल श्री अ वि. आगाशे, पुस्तकाच्या कव्हरवरील डिझाईन दिल्याबद्दल श्री. वा. वा. दीक्षित व पुस्तक सुबक व जलदीने छापून दिल्याबद्दल ‘ लोकसंग्रह छापखान्या ’ चे चालक श्री. श. रा. दाते, बी. ए. याचाहि मी आभारी आहे.

शेवटी, रसिकानी या माझ्या पहिल्या प्रयत्नाच्या गुणदोषांची निर्भीड चिकित्सा करावी अशी त्याना विनति करून व त्यानी दाखविलेले दोष पुढील लेखनात टाळण्याचा प्रयत्न करण्याचे त्याना आश्वासन देऊन मी ‘ छापील ससारा ’त पाऊल टाकण्याची रसिकाना विनति करतो.

८९२ सदाशिव पेठ, पुणे २.
तारीख १।१०।३८

शंकर गोविंद साठे

# १

[ भगवन्तराव कुलकर्णी याच्या घरांतील उठण्याबसण्याचा हॉल. भामिनी स्वयंपाकघरांतून घाईघाईने येते व हॉलमधील कपाटे उघडून शोधूं लागते. पुस्तकांच्या कपाटांतील पुस्तकें बाहेर काढून टाकते. ‘ कुठे गेला कुणास ठाऊक ’ असें म्हणून शोधीत शोधीत पुन्हां आंत जाते. सोपाना गडी हातांत केरसुणी घेऊन येतो, पुस्तकें लावून ठेवतो व केर काढू लागतो. पुस्तकाच्या कपाटाजवळ त्याला अड्याची टरफलें दिसतात. आश्चर्यानें तो तीं उचलतो व केरसुणीवर ठेवून जातो. भामिनी शोधीत शोधीत पुन्हां प्रवेश करते. पुस्तकें नीट लावून ठेवलेली पाहतांच तिला आश्चर्य वाटतें व तो सोपानाला हांक मारते. ]

**भामिनी :** सोपाना–ए सोपाना– (सोपाना येतो) हीं पुस्तकं कुणी लावली रे ?

**सोपाना :** म्याच लावली.

**भामिनी :** मला सांगितल्याशिवाय का लावलींस ? बरं, हा हॉल झाडलास का ?

**सोपाना :** ह्या आत्तांच झाडून गेलों.

**भामिनी :** मग झाडतांना तुला कांहीं सांपडलं का ?

**सोपाना :** झाडतांना ? नाय नाय– काय नाय.

**भामिनी :** कांही नाही ?

**सोपाना :** (आठवल्यासारखें करून) झाडतांना व्हय? झाडतांना—काय बी नाय.

**भामिनी :** पहा नीट आठव.

**सोपाना :** तसं— तसं लई सांपडलं— पन् (घुटमळतो)

**भामिनी :** सापडलं ना ? आण पाहू लवकर.

**सोपाना :** आणू कुठून ? त्ये मी समद क्येराच्या पेटीत नेऊन टाकल नव्ह का.

**भामिनी :** म्हणजे ?

**सोपाना :** मग बाईसाब क्येर कचऱ्याच्या पेटीत—

**भामिनी :** म्हणजे नुसता केरच ?

**सोपाना :** हा—नुसता क्येरच; त्यो पाहिजे तर आणतों परत.

**भामिनी** ( रागाने ) **:** कचऱ्याची पेटीच आणून इथे ओत. अजागळ मेला.

**सोपाना :** पन् बाईसाब, अड्याची टरफल पेटीत—

**भामिनी :** तें जाऊ दे रे—(पुन्हां शोधूं लागते).

**सोपाना :** मग काय करू बाइसाब ?

**भामिनी :** आतां तू इथून जा म्हणजे मिळाल सगळ (तो जाऊं लागतो, त्याला परत बोलावून) आज सकाळपासून कोणी परक माणूस आलं होत का रे ?

**सोपाना :** परक माणूस ? नांव काढू नका. माझा दरवाज्यावर सारखा पहारा असतांना कुणाची टाप लागली आहे घरात पाऊल टाकायची ?—घरांतले दोन पाव्हणे—चचलाबाई न् साहेबाचे स्नेही त्ये धुरधरराव—बस्स. याखेरीज तिसरा माणूस घरांत सोडला नाय—

**भामिनी :** हें बघ—तुला केव्हां तरी एकदां सांगणारच होते. याच्याकडे येणाराजाणारांवर नीट लक्ष असूं दे तुझं.

**सोपाना :** म्हंजी ? साहेबांच्या मित्रावर पाळत ?

**भामिनी :** हो हो—मित्रांवर सुद्धां (अर्धवट स्वतःशीच) मित्र कसले ? मैत्रीचं सोंग आणून शिताच्या आशेनं गोळा होणारी भुतं आहेत सगळी.

घरांत मूलबाळ नाहीं–तेव्हां आमच्या इस्टेटीवर वारसा सांगायला सगळ्या पचक्रोशीतले लोक जमले नाहीत तरच नवल !

**सोपाना :** या–या धुरंधररावाच्यावर सुद्धां–

**भामिनी :** हो–हो त्याच्यावर सुद्धां–सगळे मेले सारखेच.

**सोपाना :** बाकी माझी नजर आहेच त्यांच्यावर; काय त्ये त्यांचं डोळं, अन् पावल बी अक्षी चोरून मांजरावाणी—

**भामिनी :** अस ? मग यापुढें तर जास्तच पाळत ठेव त्यांच्यावर. बरं पण या दोघाखेरीज आणखी नव्हत ना कुणी आलं ?

**सोपाना :** नाय, कोन नाय– हां आला व्हता– एक कुत्रा आला व्हता दरवाजाजवळ, पण त्याला बी हाकूनशान दिला–

**भामिनी :** रस्त्यावरच्या कुत्र्याशीं सुद्धां भांडत होतास ना ? चांगलं; तुला शहरांत येऊन आतां इतके दिवस होत आले, पण तुझा भांडखोर स्वभाव काही अजून जात नाही. जा लाग कामाला.

(सोपाना जातो, भामिनी आपलें सशोधन पून्हां सुरू करते. पुस्तकांच्या कपाटाजवळ उभी राहून हळू हळू वाकत ती कपाटाचे सर्व खण न्याहाळते. भगवन्तराव प्रवेश करतात. भामिनीची ही विचित्र हालचाल पाहून ते जागच्या जागी थबकतात. शोधता शोधतां, ‘कुणी आल नाही, गेलं नाही मग कठा गेला तरी कुठं ?’ असें स्वतःशीच म्हणते. तें भगवन्तराव ऐकतात.)

**भगवन्त० :** काय चाललं आहे ?

**भामिनी (दचकून) :** कांही नाही–अं–अं–कंटाळा आला म्हणून कपाटांतल एकाद पुस्तक पहात होते वाचायला.

**भगवन्त० :** मग ? पुस्तकं कपाटाच्या खाली ठेवलीं आहेत वाटतं ? नाही– कपाटांत पुस्तक पाहयची सोडून तू कपाटाच्या खाली वांकून पहात होतीस म्हणून विचारल.

**भामिनी :** चुकून एकादं पुस्तक कपाटाच्या खाली पडलं असेल म्हणून सहज वाकून पाहयलं. तुम्हाला काय वाटलं– मी कांही तरी शोधते आहे म्हणून ?

**भगवन्त० :** हो. मी पाहतोंच आहे. दोनचार वेळा खालीं वाकून

पहात होतीस– पुन्हां ताठ उभी राहिलीस– पुन्हां वांकलीस– तेव्हां साहजिकच–

(भामिनी मोठ्यानें हंसू लागते; त्यामुळें भगवन्तरावांचें वाक्य अर्धवटच राहतें. ते तिच्याकडे आश्चर्यचकित मुद्रेनें पाहूं लागतात.)

**भामिनी :** तेव्हां काय? –तुम्हांला वाटलें की मी कांहीं तरी शोधते आहे म्हणून– असंच ना? (पुन्हां हंसू लागते.)

**भगवन्त० :** हो, हो, असंच. शोधीत नव्हतीस मग काय कपाटाची लांबीरुंदी मोजीत होतीस वाटतं?

**भामिनी :** तो एक स्त्रियांच्या व्यायामाचा प्रकार आहे.

**भगवन्त० :** हा काय आज नवीनच प्रकार काढला आहेस?

**भामिनी :** स्त्रियांना घरबसल्या कोणता व्यायाम घेतां येईल या विषयावर गेल्या महिन्याच्या 'स्त्री' मासिकाच्या अंकांत एक लेख आला आहे ना? त्यांतला एक व्यायाम मी करून पहात होते.

**भगवन्त० :** अशी उडवाउडवी करूं नकोस.

**भामिनी :** उडवाउडवी कशाला? खरं तेंच सांगते आहे. तस कशाला–मी मुळी अंकच काढून दाखविते. ('स्त्री' मासिकाचा अक उघडून दाखवीत) ही पाहिलीत–ही 'ड' आकृति?–ऐका हं (वाचते).

"प्रथम दोन्ही पाय जुळवून ताठ उभे राहावे. हात कमरेवर ठेवून डोकें हळुहळू पुढे ढकलण्याचा प्रयत्न करावा व तसेंच डोकें हळुहळू मागे आणावे. नंतर मान ताठ ठेवून, हात पुढें पसरून, हातानें कांहीतरी शोधीत असल्याचा आविर्भाव करावा. पुन्हां पाय जुळवून, कमर वांकवून, डोके हळुहळू पायाजवळ नेऊन, जमिनीवरील वस्तूकडे दृष्टि खिळवून ठेवावी. कांही वेळानें पुन्हां ताठ उभें रहावें. हा व्यायाम दिवसांतून पांचसहा वेळां घ्यावा."

**भगवन्त० :** राम राम राम राम! मला पाहिल्याबरोबर तुझं हें आरोग्यशास्त्राचं तत्त्वज्ञान पुढें नाही आलं तरच नवल.

**भामिनी :** एक साधा व्यायाम घेत होते मी–त्यांत कसलं हो तुम्हांला शास्त्रन् तत्त्वज्ञान दिसलं?

**भगवन्त० :** काय ग, हा जो आत्तां व्यायाम घेत होतीस तो साधाच

व्यायाम वाटतं ? पण या इतक्या साध्या व्यायामाला ही ' ड ' आकृति कशाला हवी ?

**भामिनी :** हं, जाऊं द्या–मी कितीहि जीव तोडून सांगितलं तरी तुम्हांला नाहीं समजायचं तें—

**भगवन्त० :** बरोबरच आहे. तुझ बोलण मला कसं समजणार ? बोलण्याचालण्याच सुद्धां तूं शास्त्रन् तत्त्वज्ञान बनवून ठेवलेल; ते माझ्या-सारख्या साध्या व्यवहारी माणसाला कसं बर समजावं ? नाही तरी अली-कडे या शास्त्रांनी फारच गोंधळ माजवला आहे. लघुकथा कशा लिहाव्या याचं शास्त्र, पत्रं कशी लिहावी याचं शास्त्र, अळूच्या भाजीत मीठ किती घालावं याचं शास्त्र–इतकंच काय पण ढेकूण कसा मारावा याचं सुद्धां शास्त्रच! या तुझ्या शास्त्रप्रयोगांत मी मात्र मधल्या मधें ढेकणासारखा चिरडला जात आहें !

**भामिनी :** माझी टवाळी करायला तर तुम्ही टपूनच बसलां आहांत; मी थोडीच आपण होऊन आले होते सांगायला ? तुम्ही विचारलत ' काय करतेस ' म्हणून सांगितलं. मी जातेच आपली—

**भगवन्त०** (तिला अडवीत) **:** कांही तरी सबब काढून अशी निसटून जाऊं नकोस. (तिच्या हातांतील मासिकाचा अंक दूर ठेवीत) हें बघ, ही ' ड ' आकृति ठेव जरा बाजूला अन् खरं सांग पाहूं, कांही तरी शोधीत होतीस का नाहीं तें ?

**भामिनी :** म्हणजे ? मी सांगितल तें सगळं खोटेंच वाटतं ? अहाहा, काय पण स्वतःच्या बायकोवर विश्वास आहे !

**भगवन्त० :** सध्यांच्या काळांत बायकोवर काय पण स्वतःवरसुद्धां विश्वास ठेवायची सोय राहिली नाहीं. दिवसाढवळ्या असे घरांतले कंठे नाहीसे होऊं लागले—

**भामिनी** (चमकून) **:** म्हणजे तुम्हांला कस समजलं ?

**भगवन्त० :** कसं न् काय–तुला काय वाटलं–मी आहें अगदीं दुध-खुळा ! तुझ्या त्या ' ड ' आकृतींत मी एकदम गार होऊन जाईन अशी तुझी कल्पना.

**भामिनी** : आतां ही 'ड' आकृति तुम्हांला जन्मभर पुरेल ह-चालू द्या. मी मुळीं बोलतच नाही.

**भगवन्त०** : तूं बोलायची जरुरीच नाहीं. तूं बोलण्याआधीच मला सगळ कांही समजलं आहे. आतां तरी सरळ सांग. कठा मघापासून सांपडत नाही—होय ना ?

**भामिनी** (खालच्या मानेनें गुरगुरत) : होय.

**भगवन्त०** : हेंच पहिल्या प्रथम सांगितलं असतंस तर ? पण नवऱ्याला सरळ उत्तर म्हणून द्यायचं नाही असा नियम कुठल्या तरी पुस्तकात तू वाचलेला दिसतो आहेस ! बर—कठा कुठे ठेवला होतास हे तरी आता सरळ सांगशील का ?

**भामिनी** : या कपाटात.

**भगवन्त०** : काय ? या कपाटात ? छान छान ! कठा ठेवायला काय नामी जागा शोधून काढलीस पण ! पुस्तकांच्या कपाटात मोत्यांचा कठा ! शास्त्रीय पद्धतीन काय नमुनेदार संसार करते आहेस ! बर—कपाटाला कुलूप तरी ?

**भामिनी** ( खालच्या आवाजांत ) : ऊ—हू.

**भगवन्त०** : कपाटाला कुलूप नव्हतं ? वा: वा: उत्तम ! बरं, कपाटाची दारबिर सताड उघडींच असतील बहुतेक—

**भामिनी** ( खाली पहात ) : हुं.

**भगवन्त०** ( उपरोधिक स्वरांत ) : शाबास ! गांवांतल्या प्रत्येक आर्यस्त्रीनं उजाडतांच तुझ दर्शन घ्याव एवढी तुझी योग्यता मोठी आहे ! काय ग, संसारशास्त्राच इतक अचूक ज्ञान तू कुठे मिळवलंस ? कोणत्या धर्मग्रंथांत ही आचारसूत्रं दिली आहेत तें तरी समजू द्या आम्हांला ! धन्य धन्य, भगवन्तराव ! असल्या शभर नबरी शास्त्रीय गृहिणीबरोबर संसार थाटून तू आज कृतार्थ झालास ! मघाशी त्या मासिकांतली 'ड' आकृति दृष्टीला पडली. पण आतां तर माझ्यासमोर ससारशास्त्रांतली मूर्तिमंत 'ढ' आकृति वावरते आहे असा मला भास होतो आहे ! ( भामिनीकडे वळून ) घरांतला कंठा चोरीला जावा म्हणून तू आपल्याकडून शक्य तितके उपाय अंमलांत आणलेस; पण एक गोष्ट विसरलीस.

'चोरीसाठी कंठा तयार आहे. चोरांनी व इतर फुकटचा गरजूनी त्वरा करावी 'अशी वर्तमानपत्रांत जाहिरात द्यायचं कसं तुझ्या लक्षांत राहिल नाही ?

**भामिनी :** माझा प्राण गेला तरी तुमच बोलणं कांही संपायचं नाही.

**भगवन्त० :** अन् हा कंठा गेला म्हणून तुझ हें विचित्र वागणं तरी थोडंच सपणार आहे ?

**भामिनी :** स्वत: करायच नाही न् दुसऱ्याला करूं द्यायचं नाही.

**भगवन्त० :** मग काय ? तुझ्याबरोबर मी सुद्धां घरांतले दागिने पुस्तकाच्या कपाटांत ठेवू म्हणतेस ?

**भामिनी :** टापटिपीन संसार करण्याच्या काय नव्या नव्या सुधारणा निघताहेत तिकडे तुम्ही तर ढुंकूनहि पहात नाही आणि मी तिकडे लक्ष देते ते सुद्धा तुम्हाला पाहवत नाही.

**भगवन्त० :** मला अजून तुझ्यासारखी दुर्बुद्धि होत नाही हे मी माझं भाग्य समजतों. तुझ्या एकटीच्या नव्यानव्या सुधारणांमुळे आपला संसार जवळ जवळ कोसळलाच आहे–त्यात आणखी माझी भर कशाला ? नव्या नव्या सुधारणा ! पुस्तकाच्या उघड्या कपाटांत मोत्याचा कंठा ठेवणं ही तुझी फारच भयकर सुधारणा आहे. मला वाटत याच्यापुढची सुधारणा म्हणजे दागिन्याच्या पेटीतून नथ उचलून ती बाहेरच्या उंबरठ्यावर ठेवणें हीच असेल बहुतेक!

**भामिनी :** चालू द्या तुमची टकळी–मी इथून जातेच कशी. आज बुधवार ? माझा न्हाण्याचा दिवस. तुमच्याशी हुजत घालण्यांत वेळ मोडला तर माझ न्हाण तसच राहून जायचं.

(भामिनी जाते–थोड्या वेळानें धरधर एक जाडा ग्रंथ वाचीत वाचीत प्रवेश करतो.)

**धुरंधर :** पाहिलंत का भगवन्तराव, हा काय म्हणतो तें ?

**भगवन्त० :** हा म्हणजे कोण ? असेल एकादा गुन्हेगारशास्त्रवेत्ता कोणी तरी–

**धुरंधर :** कोणी तरी ? भगवंतराव, हा लेखक असा तसा नाही. आमच्या चौर्यशास्त्रांतला एक मोठा अधिकारी तज्ञ आहे. या ग्रंथाचा

महिमा काय सांगावा ? हा ग्रंथ नुसता हातांत घेण्याचा अवकाश–तुमची गहाळ झालेली वस्तु ताबडतोब सांपडलीच म्हणून समजा.

**भगवन्त० :** छे–कांहीतरीच.

**धुरंधर :** थट्टा नाही–अनुभवाची गोष्ट सांगतों. एका अतिशय गुंतागुंतीच्या प्रकरणाचा तलास लावीत होतों मी. सगळा पुरावा गोळा केला न् अगदी आयत्या वेळी पुराव्याचा मुख्य कागद झाला गहाळ. सारा गांव पालथा घातला. पण पुराव्याचा कागद सांपडेना. शेवटीं निर्वाणीचा उपाय म्हणून हा ग्रंथ हातीं घेतला. काय सांगू ? ग्रंथाला हात लावला मात्र–अर्ध्या क्षणांत कागद हातीं !

**भगवन्त० :** काय म्हणतां ? आश्चर्य आहे बुवा.

**धुरंधर :** तो सुद्धां फार दूर नाही बर का–अगदी हाताशीं. ग्रंथाचं जें पान पहिल्यांदा उघडलं त्यांत आपली कागदाची घडी. बोला आतां.

**भगवन्त० :** हा ग्रंथ हाती घेतल्याबरोबर हरवलेली वस्तु सांपडते म्हणतां ? पाहूं बर–एकदां पाहू द्या तरी कसा आहे तो—म्हणजे आमचाहि एकादा जिन्नस—

**धुरंधर** (वाचण्याच्या तंद्रींत) **:** हां–सांपडला.

**भगवन्त० :** काय म्हणतां ? पान उघडल्याबरोबर सांपडला ?

**धुरंधर :** तुम्हांला जो मुद्दा वाचून दाखविण्यासाठीं मी आलों होतों तो मुद्दा सांपडला. ( पुस्तक वाचीत ) याचं म्हणणं असं की, ज्या घरांत चोरी झाली असेल त्या घरांतलं वातावरण आणि मृत्यूची झडप पडलेल्या घरांतल वातावरण सारखंच असतं. दोन्ही ठिकाणी दुःख आणि उदासीनता यांची भीषण छाया पसरलेली असते.

**भगवन्त०** (सुस्कारा सोडीत) **:** अगदीं खरं आहे.

**धुरंधर :** (पुस्तक वाचीत) आपल्याला सोडून गेलेल्या व्यक्तीच्या अगर वस्तूच्या विरहाच्या चटक्यानं या दोनहि वातावरणांत वावरणाऱ्या माणसाच्या चेहेऱ्यावर प्रेतकळा दिसूं लागते. कां हो तुमचा चेहेरा असा कां ?

**भगवन्त० :** आतां तुम्ही वर्णन करीत होतां तसल्याच परिस्थितीत मी सांपडलों आहें.

**धुरंधर :** म्हणतां काय भगवन्तराव ? विरहाचा चटका ? (भगवन्त-

राव मानेनें 'हो' म्हणतात) म्हणजे? (पुस्तकांतील मजकुरावरून नजर टाकतो.) मृत्यूची झडप—भामिनीबाईची तब्बेत ठीक आहे ना?

**भगवन्त०** (खिन्न मुद्रेनें) : हो—उत्तम आहे.

**धुरंधर :** (पुन्हां मजकुरावरून नजर फिरवीत) : मग आतां उरलेलं दुसरं अनुमान. घरांतल्या सगळ्या वस्तू जागच्या जागी आहेत ना?

**भगवन्त० :** धुरधर, घरांतला मोत्यांचा कंठा नाहीसा झाला आहे.

**धुरंधर :** काय, चोरी? या घरांत चोरी?

**भगवन्त० :** म्हणजे? आमच्या घरांत चोरण्यासारखं कांहीच नाही अशी तुमची कल्पना आहे वाटतं?

**धुरंधर :** तसं नाही. पण मी या घरांत असतांना—आणखी चोरी? माझ्यासारखा गुन्हेगार शास्त्राचा निस्सीम उपासक इथें असतांना या घरांत पाऊल टाकायची चोराची छाती कशी झाली?

**भगवन्त० :** तें मी काय सांगू? चोर सांपडला म्हणजे त्यालाच विचारा.

**धुरंधर :** तें कांही नाहीं. मला या प्रकरणांत ताबडतोब लक्ष घातलंच पाहिजे. तुम्ही आतां पूर्ण निर्धास्त रहा. तुमची चोरी सांपडलीच म्हणून समजा.

**भगवन्त० :** नुसतं समजून काय व्हायचंय्? माझा कठा मी डोळयांनी पाहीन तेव्हांच माझं समाधान होईल. थोडाथोडका नाही—चांगला दीड हजारांचा कंठा—

**धुरंधर :** त्याची मुळेच काळजी करूं नका. आजपर्यंत गुप्तपोलिसांच्या कौशल्यानं उतू जाणारीं अनेक कथानकं तुम्ही नाटककादंबऱ्यांतून वाचली असतील; पण जातिवन्त गुप्तपोलिसाच्या कौशल्याचा अजब नमुना तुम्हांला आतां या घरांत प्रत्यक्ष पहायला मिळणार आहे. अहाहा! भगवन्तराव, तुमचा कंठा हरवल्याचं समजल्यापासून मला किती आनंद झाला आहे म्हणून सांगू—

**भगवन्त० :** तुमचा स्वतःचा कंठा हरवला असता म्हणजे समजलं असतं. म्हणे आनंद झाला आहे—

**धुरंधर :** तसं नव्हे—या चोरीमुळें तरी माझ्या शास्त्रीय संशोधनाला

वाव मिळाला म्हणून मला हा शास्त्रीय, सात्त्विक आनंद झाला आहे. एरव्ही आमचं कसब लोकांच्या डोळयांत भरावं कसं ?

**भगवन्त०** : स्पष्ट विचारतों– रागावू नका. पण तुमचं हें कसब लोकांच्या डोळयांत भरावं म्हणून तुम्हीच तर हा कठा उचलून कुठे ठेवला नाहीत ना ?

**धुरंधर** : छे छे ! चौर्यशास्त्राचं असं विडबन आमच्या हातून कधीच होणार नाही–आता वेळ न दवडतां एकदम कामाला सुरुवात केली पाहिजे.

**भगवन्त०** : तुमच हे शास्त्रीय संशोधन चालू द्या. मी एकदां पोलिसांत वर्दी देऊन येतो. म्हणजे त्यांचाहि तपास होईल सुरू.

(जाऊ लागतात)

**धुरंधर** : तुम्ही पोलिसांत वर्दी देणार असाल तर मी याच पावली घराबाहेर जातों कसा. पोलिसांचं न् आमच मुळीच पटायचं नाही.

**भगवन्त०** : न पटायला काय झाल ?

**धुरंधर** : मला अस सागा–तुम्ही गुप्त पोलिसाच्या थोडयाफार गोष्टी वाचल्या आहेत की नाहींत ?

**भगवन्त०** : रामराव डिटेक्टिव्हच्या कांहीं वाचल्या आहेत.

**धुरंधर** : होय ना ? मग रामराव डिटेक्टिव्ह आणि इन्स्पेक्टर राणे यांचं एका तरी गोष्टीत कधी पटल्याच तुम्हाला आठवत का ?

**भगवन्त०** (आठवून) : नाही बुवा.

**धुरंधर** : झालं तर–त्याचे मार्ग वेगळे आमचे वेगळे.

**भगवन्त०** : पण मार्ग वेगळे असले तरी ध्येय एकच ना ?

**धुरंधर** : मुळीच नाही. पोलिसाच काय ? हव्या त्या हिकमती करून चोर पकडायचा एवढच त्याच ध्येय.

**भगवन्त०** : हो–अन् तुम्ही ?

**धुरंधर** : आमचं तस नाही. चोर पकाडायचा हे आमचं ध्येय नाही. नुसता चोर पकडण्यांत काय आहे ? पोलिसांनी नुसता चोरच पकडावा. आमच्या शास्त्रीय सशोधनाची त्यांनीं काय बरोबरी करावी ? आमची शास्त्रीय तत्त्वं, तर्कबुद्धीच्या कसोटीवर घांसून निघणारी आमची शास्त्रीय अनुमानं,

या सगळ्याचा रोख चोराकडे नसतो. आमचा रोख गुन्ह्याच्या कार्यकारण संबंधाकडे असतो. कुठें निघालांत ? पोलिसांकडे ?

**भगवन्त० :** तुमचं हें शास्त्रीय संशोधन सुरू ठेवाच तुम्ही. माझं म्हणण अस की, ही चोरी सांपडण्यासाठीं आपण सगळे उपाय एकदम सुरू करूं या. तुमचं शास्त्र, तत्त्व काय तें तुम्ही चालवा. पोलीस बिचारे अशिक्षित–त्याना तुमच्या या शास्त्रातलं काय कळणार आहे दगड? ते आपले नुसता चोरच पकडतील–आलोंच हं मी. ( जाऊ लागतात )

**धुरंधर :** छे छे; हा ग्रथ आणि मी–दोघे असल्यावर पोलिसाची जरुरीच काय ? त्यांना बोलावलत तर जातां जातां तेच काही तरी तुमच्या घरांतल लाबवतील. तें कांही नाही. मी कामाला एकदम सुरुवातच करतों. तुम्ही मुळीच काळजी करूं नका.

**भगवन्त० :** राहिलं आमचं.

**धुरंधर :** मात्र माझा तपास चालू असेपर्यत दोन महत्त्वाच्या गोष्टी तुम्ही ध्यानांत ठेवल्या पाहिजेत.

**भगवन्त० :** त्या कोणत्या ?

**धुरंधर:** मी विचारीन त्या प्रश्नांची उत्तरं द्यायची आणि मी सांगेन ते निमूटपणे करायच.

**भगवन्त० :** कबूल– कबूल.

**धुरंधर :** मी यापुढे तुमचा स्नेही, पाहुणा या नात्यान वावरत नसून एक शास्त्रज्ञ, सशोधक, अभ्यासक या नात्याने तुमच्या समोर उभा आहे, समजल ? (खिशांतून टिपणवही काढून ) बोला आपल नांव ?

**भगवन्त० :** काय उगाच थट्टा मांडली आहे माझी ?

**धुरंधर :** मी अतिशय गभीर असून तुम्ही मात्र चौर्यसशोधनशास्त्राची थट्टा करतां आहां. केस हातांत घेतली की तिचा सूक्ष्म अभ्यास केल्याशिवाय पाऊल पुढें पडायचं नाही आमचं. म्हणून अगदी पायापासून सुरुवात करतो आम्ही.

**भगवन्त०** (त्रासून) **:** आमच्या पायांचा कशाला– चोरांच्या पायाचा सूक्ष्म अभ्यास करा म्हणजे चोरी सांपडेल कदाचित्. बरं विचारा.

**धुरंधर :** आपलं नांव ?

**भगवन्त०** : भगवंत पांडुरंग कुळकर्णी.

**धुरंधर** (एकीकडे टिपण करीत) : वय ?

**भगवन्त०** : पंचेचाळीस.

**धुरंधर**: जात ?

**भगवन्त०**: ब्राह्मण.

**धुरंधर**: वार्षिक उत्पन्न ?

**भगवन्त०** : पांच हजार.

**धुरंधर** : धंदा ?

**भगवन्त०** : लोकांना सांगण्यापुरता धंदा वकिलीचा. बाकी नुसतं घरचच पाहतों मी.

**धुरंधर**: आपलं लग्न झालं आहे का ?

**भगवन्त०** ( सुस्कारा सोडीत) : होय.

**धुरंधर** : बरं– बायको पहिली की दुसरी?

**भगवन्त०**: दुसरी.

**धुरंधर** : म्हणजे पहिली हयात असून दुसरी का नुसतीच दुसरी ?

**भगवन्त०** : नुसतीच दुसरी.

**धुरंधर** : या घरांत बाहेरचीं कोणकोण माणसं येतात ?

**भगवन्त०** भिकारी, गोसावी, रामदासी, गवळी, वर्तमानपत्र टाकणारा मुलगा, गोरक्षणाची पेटी फिरवणारे स्वयंसेवक–

**धुरंधर** : ठीक–घरांत सध्यां माणसं किती?

**भगवन्त०** : मी, आमची बायको, सोपाना गडी आणि दोन पाहुणे. चंचला आणि तुम्ही.

**धुरंधर** : ही चंचला कोण ?

**भगवन्त०** : ती ना ? आमच्या बायकोच्या विस्तीर्ण वंशवृक्षाचं तें एक बारकं पान आहे.

**धुरंधर** : बायकोचा वंशवृक्ष ? म्हणजे काय ?

**भगवन्त०** : कांहीं विचारूं नका. लग्नापूर्वी आमच्या हिला माहेरचं असं कुत्रंसुद्धं नव्हतं. पण लग्न व्हायचा अवकाश–हिच्या माहेरच्या गोतावळ्याचा एक मोठा संप्रदाय निर्माण झाला आहे म्हणा ना. हरतऱ्हेचीं

नातीं उकरून काढून हिच्या माहेरचे सगळे गांवकरी एकेकदां तरी इथे राहून गेले आहेत. त्यांपैकींच ही एक चंचला आहे.

**धुरंधर :** पण तिचं नातं काय ?

**भगवन्त० :** फार जवळचं नातं आहे. हिच्या माहेरच्या घरासमोर एक बिऱ्हाड होतं–गणपुल्यांचं. त्या गणपुल्यांचा एक लांबचा मावसभाऊ असतो सोलापुरास. त्याच्या मावसभावाच्या मित्राच्या बहिणीची मुलगी.

**धुरंधर** (काळजीपूर्वक टिपून घेत) **:** म्हणजे ती तरतरीत नाकाची मुलगी कालपासून–

**भगवन्त० :** होय तीच. ती चंचला न् तुम्ही; बस्स–बाहेरचीं ही दोनच माणसं.

**धुरंधर :** बरं, कंठा चोरीस केव्हां गेला ?

**भगवन्त० :** नक्की वेळ मला माहीत नाहीं. या पुस्तकाच्या कपाटात ठेवला होता असं ती म्हणते. सकाळपासून कंठा कपाटांत नाही.

**धुरंधर** (सूक्ष्मदर्शक यंत्रानें कपाट न्याहाळीत) **:** याच कपाटांत ?

**भगवन्त० :** होय.

( हे प्रश्न विचारीत असतां धुरंधर एकीकडे जाडच्या भिंगांतून सर्व जिनसा न्याहाळतो.)

**धुरंधर :** आतां असं सांगा, कपाटांत कंठा ठेवला कुणी ?

**भगवन्त० :** आमच्या बायकोनं. पुस्तकाच्या कपाटांत कंठा ठेवण्याइतकं माथेफिरू माणूस तिच्याखेरीज कोण असणार ?

**धुरंधर :** कंठा गेल्याचं तुम्हाला कसं कळलं ? तुमच्या बायकोनं सांगितलं ?

**भगवन्त० :** तिनं नाही सांगितलं–मी तिच्या तोंडून वदवून घेतलं.

**धुरंधर :** आणखी एक प्रश्न. तुमचा संसार कसा काय चालला आहे?

**भगवन्त० :** घरोघर मातीच्याच चुली. चाललाय झालं चारचौघांसारखा!

**धुरंधर :** असं गुळमुळीत उत्तर नको. स्पष्ट सांगा. तुमची बायको तुमच्या तंत्रानं वागते कीं नाहीं ?

**भगवन्त०** ( काकुळतीच्या स्वरांत ) : या प्रश्नाचं उत्तर मी दिलंच पाहिजे कां हो ? या प्रश्नावांचून चोरी सांपडली तर पहा ना !

**धुरंधर :** तें चालायचं नाही. कदाचित् हा मुद्दा फार महत्त्वाचा ठरण्याचा संभव आहे. हं, बोला लवकर. तुमची बायको तुमच्या तंत्रांन वागते कीं नाही ?

**भगवन्त० :** तिच्या वागण्याचं सुद्धां एक वेगळंच तंत्र आहे!

**धुरंधर :** ते काय बुवा ? हे पहा, माझ्यासमोर संकोच बाळगण्याचं कांही कारण नाही. डॉक्टर आणि गुप्त पोलीस यांच्यापासून काही लपवून ठेवू नये, आहे ना माहीत ?

**भगवन्त० :** सांगतों सगळं. करतां काय ? धुरंधर, आमचं लग्न होऊन इतकी वर्षं झाली. पण संसारात तिनं कधी लक्ष घातलं असेल तर शपथ. ही माझी दुसरी बायको. तेव्हां मी हिचं किती कोडकौतुक करीत असेन तें वेगळं सांगायला नकोच. पण हिला आहे का कांही त्याचं ? खोटं वाटेल तुम्हांला. पण दोन वेळचं साधं जेवण–तें सुद्धां माझ्या नशिबांत लिहिलेलं नाही! स्वयंपाकाला आचारी ठेव, घरांत कामाला दोन गडी जास्त ठेव म्हटलं तर ते तिला पटत नाही. संसारातल्या प्रत्येक बारीक सारीक गोष्टींत लक्ष घालून आदर्श संसाराचा नमुना सगळ्या जगाला दाखवावा असा हिचा पहिल्यापासून अट्टाहास. या तिच्या ध्येयपूर्तीच्या झगड्यांत माझे मात्र मधल्यामधे हाल होताहेत. साधा वरणभात–तो सुद्धां धड करतां येत नाही तिला. पण रोज कुठल्या तरी पुस्तकांतली अर्धी कच्ची माहिती वाचते न् कसला तरी पाला उकळून मला खायला घालते! मी म्हणजे तिच्या पाकशास्त्राच्या अभ्यासाची प्रयोगशाळाच बनलों आहे म्हणा ना ! रोज काही ना कांहीं आंबुसलेलं, करपलेलं तयार करते न् तें सारं अबोल मला निमूटपणं खावं लागतं हो ! नाविन्याच्या नादी लागून ती काय काय भयंकर पक्वान्नं बनवते सांगू का ? कारल्यांचं थालीपीठ, करवंट्याचं भरीत, चहाच्या चोथ्याची चटणी, मिरच्याच्या करंज्या, फणसाच्या सालीचं रायतं, कोंड्याचे वडे–काय सांगू ? माझे नुसते धिंडवडे चालवले आहेत तिनं! कां हो, झोंप लागली वाटतं ?

**धुरंधर** (हळुहळू डोळे उघडीत) **:** बोला बोला, थांबू नका, एक-

सारखे बोलत राहा. माझ्या डोक्यांत शास्त्रीय अनुमानं नाचू लागलीं आहेत, हं–बोला तुम्ही.

**भगवन्त० :** आतां बोला काय कपाळ ? उरलंय् काय बोलायचं ? जाऊं द्या झाल. कोळसा उगाळावा तितका काळाच.

**धुरंधर :** आता अस सांगा–ज्या कपाटातून कठा नाहीसा झाला त्यांत काय आहे ?

**भगवन्त० :** त्यात ना ?–माझ्या बायकोच्या छापील संसाराची कर्मकहाणी, दुसर काय ? यांतली एकेक पुस्तक तर पहा–हा 'व्यवहार-कोश.' हें काय ? 'यशस्वी ससाराची बारा सूत्रे,' 'स्वयंपाक घरातील कला,' 'भाजीपाल्याचे महत्त्व,' हा 'टापटिपीचा ससार,' हा 'गृहिणी-धर्म,' 'बाजारहाट कसा करावा,' 'घरगती डॉक्टर,' हा 'ससारसौख्य-सोपान,' हा 'पक्वान्नचितामणी,' 'केर काढण्याच्या पद्धती (सचित्र)' हे एक नाटकाचं पुस्तक आहे त्याच नांव पहा–'नवऱ्याला वेसण'.

**धुरंधर** (घाईनें टिपणें करीत असता विसाव्यासाठीं मधेच थांबून घाम पुशीत) : बाप रे !

**भगवन्त० :** एवढयानंच सपल नाही. 'स्त्री' मासिकाच्या अंकाचे गठ्ठे पडले आहेत ते वेगळेच. भरीस भर म्हणून अलीकडे वर्तमानपत्रानी सुद्धां 'महिलाची पान' सुरू केली आहेत. त्यातलीं कटिंग्ज कापून, चिक-टून हा पहा केवढा मोठा ग्रथराज तयार झाला आहे तो ! ही भितीवरलीं कोष्टकं पाहिलीत ? कोणत्या भाजीपाल्यात कोणती व्हिटॅमिन्स किती प्रमाणांत आहेत त्याची तौलनिक कोष्टक आहेत ती ! या भाजीपाल्यांच्या पसाऱ्यांत मी कुठल्या झाडाचा पाला, धुरधर ?

**धुरंधर :** एकदरीत तुमच्या बायकोचा स्वभाव बराच खर्चिक दिसतो. हा मुद्दा महत्त्वाचा आहे. ( टिपून घेत ) खर्चिक स्वभाव—

**भगवन्त० :** खर्चिक नाही, उधळ्या म्हणा. कालच चार रुपये मोजून तिन काटकसरीच महत्त्व हे पुस्तक विकत घेतल–बोला काय म्हणाल तुम्हीं याला ?

**धुरंधर :** आतां शेवटचा प्रश्न–तुमचा सशय कोणाकोणावर आहे ?

**भगवन्त० :** तस म्हणाल तर प्रत्येक माणसावर माझा संशय आहे.

आतां आमचा सोपाना गडी—आमच्या गांवचा—पूर्ण विश्वासू आहे. आमची ही—वागण्यांत कितीहि छांदिष्ट न् तऱ्हेवाईक असली तरी स्वतःचा कंठा उगाचच कोठेंतरी लपवून चोरीचा खोटा बोभाटा करील असं नाहीं वाटत. तुम्हीं—या असल्या चोरीच्या पंथांतले नाही असं घटकाभर धरून चालतों. म्हणजे राहिली चचला—आणि तिच्याबद्दल मात्र मला जबर संशय येतो आहे

**धुरंधर :** कां बरं ?

**भगवन्त० :** कारण ती हिच्या माहेरचं नातं उकरून काढून आली आहे म्हणून.

**धुरंधर :** म्हणजे ? त्यांच्या माहेरच्या नातेवाइकांचा आणि तुमच्या संशयाचा काय सबंध ?

**भगवन्त० :** फार जवळचा संबंध आहे. मी आमच्या बायकोला कधी दुखवीत नाही, तिच्या लहरीप्रमाणें निमूटपणे वागूं देतों त्याचा हा सगळा परिणाम आहे. हवे ते लोक घरांत येतात, हिच्या तोडावर गोडगोड बोलतात न् हिला लुबाडतात, तें कांहीं हिच्या डोक्यांत शिरत नाही. ही चचलाच पहा—कधी नांव सुद्धां ऐकलं नव्हतं इतक्या वर्षांत. पण आल्यापासून ती सारखी आमच्या हिच्याभोंवतीं घोंटाळते आहे. हिच्या घरची पैशाची स्थिति म्हणे बेताबाताचीच आहे; तेव्हां असल उघड्या कपाटांतलं ऐश्वर्य पाहून तिच्या तोंडाला पाणी सुटलं तर त्यांत कसलं आश्चर्य ?

**धुरंधर** (टिपून घेत) : वा, वा—फारच महत्त्वाचा मुद्दा, या एका मुद्यामुळ माझ्या डोक्यात नव्यानव्या अनुमानांचा शास्त्रीय गोंधळच सुरू झाला आहे. बरं—ही चचला कुमारिकाच आहे ?

**भगवन्त० :** होय; कां हो ? फारशी बारीक चवकशी चालविली आहे ?

**धुरंधर :** बारीक चवकशा करणं हें तर आमच्या शास्त्राचं ब्रीद ! इतका वेळ तुमच्या तोंडून जी हकीकत ऐकली त्यावरून यापुढें या चंचलेवर बारीक नजर ठेवायला पाहिजे अशी माझी खात्री झाली आहे.

**भगवन्त० :** काय वाटेल तें करा पण माझा कंठा शोधून काढा म्हणजे झालं. अजून वाटतं—आपलं पोलिसांत कळवलेलं—

**धुरंधर :** आतां पुन्हां पोलिसांचं नांव काढाल तर—



चौर्यशास्त्रतज्ज्ञ धुरंधर ते हेच ! भगवन्तरावांचा हरवलेला कंठा
त्यांना पुस्तकांत सांपडला वाटतं !

**भगवन्त० :** बरं बुवा, राहिलं.

**धुरंधर :** मी माझ्या तपासाला सुरुवात करतों. तुम्ही चंचला खोलीत एकटीच आहे ना पाहून या, म्हणजे एकदम मोहिमेला सुरुवातच करूं.

(भगवन्तराव जातात. धुरधर कपाटाखाली वांकतो, ठसे न्याहाळतो व मातीचे पोपडे, केर गोळा करून तो निरनिराळ्या पुड्यांतून बांधूं लागतो. सोपाना येतो. धुरधरला खिशांत कांही तरी टाकतांना पाहून तो झटकन् पुढें होतो. त्याची चाहूल लागतांच धुरंधर चपापून एकदम सरळ उभा राहतो व कपडे झटकतो.)

**सोपाना :** काय चाललंया ?

**धुरंधर :** काही नाहीं या कपाटाजवळून चाललों होतों–एकदम असा पाय मुरगळलाय्–ओऽय ओऽय (बळेच विवळतो.)

**सोपाना :** पन असं कोपऱ्याकोपऱ्यानं कुठं चालला व्हता ? अन् त्ये खिशात काय टाकलंया ? ह–काढा भाईर.

**धुरंधर :** कुठे काय ?—काही नाही.

**सोपाना :** कांही नाही कसं ? ह–काढा काढा भाईर–

**धुरंधर :** हा–हां. त्या पुड्या म्हणतोस होय ? ती औषधी भस्मं आहेत.

**सोपाना :** पाहू तर खर कसली भसामं हैत ती ! (पुड्या सोडतो) वा रे भसाम ! क्येर न् पोपडं–ठेवा हं, नीट जपूनशान ठेवा; नाहीतर कुणी तरी चोरून नेईल ! (हसत सुटतो.) वा रे भसाम ! क्येर न् पोपडं (पुन्हा जोराने हसू लागतो. चंचला येते.)

**चंचला :** सोपाना, हसायला रे काय झाल ?

**सोपाना :** काय नाय–औषधी भसामं–(पुन्हां हंसतो)

**चंचला :** तुझा वात्रटपणा पुरे कर. आंत जाऊन बाईसाहेबांचं न्हाणं झालं की नाही बघून ये.

(सोपाना धुरधराकडे पाहात "क्येर न् पोपडं, औषधी भसामं" असें हंसत हंसत म्हणत निघून जातो. धुरधर चंचलेकडे आपल्या शास्त्रीय शोधक नजरेने निरखून पाहू लागतो. )

**धुरंधर :** चचलाबाई नाही का तुम्ही ?

**चंचला :** हो. अन् तुम्ही–

**धुरंधर :** घाबरूं नका. मी कांही कुणी पोलीसखात्यांतला नाही. तुम्ही सोलापुरास असतां, होय ना ?

**चंचला :** तुम्हांला माझी बरीच माहिती दिसते आहे.

**धुरंधर :** तुमच्यासारख्यांची माहिती कुणाला नसणार ? तुम्ही जाल तिथें गांवोगांव तुमची कीर्ति तुमच्या अगोदरच पोंचलेली असायची. तुमच्या कार्याचा उरकच एवढा दांडगा !

**चंचला :** कसला आला आहे कार्याचा उरक-थोडं फार जमेल तितक-

**धुरंधर :** असं कां म्हणतां ? मी मी म्हणणाऱ्यांच्या हातून जन्मभर प्रयत्न करूनसुद्धां जे व्हायच नाही तें तुम्ही हातोहात पांच मिनिटातसुद्धां उरकून टाकाल-

**चंचला :** पण नेहमीच बडया लोकांच्या खिशापर्यन्त आमचे हात कुठले पोंचायला ? चुकून एकादे वेळीं भामिनीसारखी कधीं काळी कुणी भेटेल-

**धुरंधर :** भामिनीबाईसारखी कशाला ? खुद्द भामिनीबाईच म्हणानात ! असा आडपडदा कशाला ?

**चंचला :** अशा मोठ्या लोकांकडून मिळेल तेवढं पदरांत पाडून घ्यायचं.

**धुरंधर :** आलं माझ्या लक्षांत.

**चंचला :** तुम्ही सुद्धां पाहुणेच आहां वाटतं माझ्यासारखे ?

**धुरंधर :** पाहुणाच आहे- पण तुमच्यासारखा मात्र नाही !

**चंचला :** म्हणजे ?

**धुरंधर :** मी आपला साधा इसम आहें. तुमच्या सारखी कामं करायचीं म्हणजे त्याला वेगळ्याच जातीचे लोक लागतात ! (तिच्याकडे निरखून पहात) तुम्हांला काल रात्री नीट झोंप लागली होती ?

**चंचला :** आतां आलं लक्षांत- तुम्ही डॉक्टर आहांत तर ! डॉक्टर नाहीं हं- चुकलें मी- वैद्य. मघाशी तुम्ही तीं औषधी भस्मं खिशांत घातलेलीं पाहिली मी, तुम्हां डॉक्टर-वैद्यांचा पहिला प्रश्न अगदीं ठरलेला- 'रात्रीं झोंप नीट लागली होती ?' हा प्रश्न अगदीं हटकून-

**धुरंधर :** हें पहा-मी डॉक्टर नाही न् वद्यहि नाही. तुमचा चेहरा किती ओढलेला दिसतोय. त्यावरून मी ओळखलं. काळजीची छटा-

**चंचला :** नुसतं माझ्या चेहेऱ्याकडे पाहून का तुम्ही इतकं सांगतां आहां ? (घाईघाईनें आरशांत पाहते).

**धुरंधर :** हो तर–तुमच्या मनांतली सगळी खळबळ तुमच्या चेहेऱ्यावर स्पष्ट दिसते आहे.

**चंचला :** (चेहेऱ्यावर पॉवडर फिरवीत) आतां नाहीं ना दिसत ?

**धुरंधर :** घाबरूं नका. भामिनीबाईच्या नाहीं लक्षांत यायचं तेवढ. त्या पहा आल्याच. (स्वगत) सामना चुरशीचा होणारसं दिसतं. सावज तरबेज आहे. या दोघी बोलण्यांत गुतल्या आहेत तोंवर हिच्या सामानाची झडती घ्यावी. (चंचलेस) दोघी मैत्रिणीत मी कशाला ?–जातों मी (आंतल्या खोलीत जातो. भामिनी प्रवेश करते. ती पिवळं पातळ नेसली असून केस पाठीवर मोकळे सोडले आहेत).

**चंचला :** का, झालं का न्हाण ?

**भामिनी :** हो.

**चंचला** (थट्टेच्या स्वरांत) : काय छान पिवळं पातळ काढलंय्स ग हें. हे तुझं पिवळं पातळ, हे तुझे मोकळे सुटलेले केस, अहाहा–ए, आतां असं कर–हातांत एकादं निशाण घे. म्हणजे कॅलेंडरावर हिंदमातेचं चित्र असतं ना तश्शी दिसशील ! काय ग, न्हाणं झाल्यावर पिवळं पातळ नेसायचं शास्त्र आहे वाटतं ?

**भामिनी :** अग तर ! माझ्या जवळ निरनिराळ्या रंगांचीं सतरा पातळं आहेत. सकाळच्या प्रहरी तू हें पोपटी रंगाचं पातळ नेसणं शास्त्रीय दृष्टीनं अगदीं गैर आहे.

**चंचला :** पण तुझ्यासारखी सतरा रंगांचीं पातळं घ्यायला माझ्याजवळ पैसा आहे कुठें ? आमच्या अनाथबालकाश्रमांतल्या मुलांना अंगभर वस्त्र मिळायची मारामार. मग कसलं रंगशास्त्र घेऊन बसली आहेस ?

**भामिनी :** अग पण आपल्या कपड्याच्या रंगाचे आपल्या आरोग्यावर काय परिणाम होतात इकडे नको का लक्ष द्यायला? 'रंग आणि आरोग्य' या पुस्तकात या विषयाची सांगोपांग चर्चा केली आहे.

**चंचला :** काय ग हा तुझा सूक्ष्म अभ्यास! मुंबई युनिव्हर्सिटीनं तुझ्यासाठीं संसारशास्त्राची खास पदवी बनवायला पाहिजे !

**भामिनी :** मला वाटलंच तूं माझी थट्टा करणार म्हणून. बरोबरच आहे. समाजांतली एकादी व्यक्ति डोळस राहून जरा कुठं एकादं पाऊल पुढें टाकायला लागली—

**चंचला :** म्हणजे तुझं पाऊल पुढें पडतंय् तर ! न् समाजांतली डोळस व्यक्ति म्हणजे—

**भामिनी :** तुला काय वाटतं ? तुझ्यासारखी एकाद्या अनाथबालकाश्रमाची सेक्रेटरी होणं म्हणजेच तेवढं समाजकार्य होतं वाटतं ?

**चंचला :** अग माझं कसलं समाजकार्य घेऊन बसली आहेस ? तुमच्यासारख्या श्रीमंत मैत्रिणी गाठायच्या, त्यांच्याकडून देणग्या मिळवायच्या आणि सस्था चालवायची—यांत कसल आलंय समाजकार्य ?

**भामिनी :** माझहि तेंच म्हणणं. प्रत्येकीनं आपला संसार नमनेदार पद्धतीनं करण हेंच खरं समाजकार्य आहे !

**चंचला :** तुझं एकादं व्याख्यान ठरवलं पाहिजे आमच्या संस्थेत. चांगलंच बोलायला लागलीस की तूं ! पण काय ग, ह्या न्हाण्यांतहि तुझं पाऊल पुढेंच कां ?

**भामिनी :** तें तुझं तूच ठरव म्हणजे झालं. न्हाण हा शब्द एकच खरा; पण इतर बायकांच्या न्हाण्यांत आणि माझ्या न्हाण्यांत काय फरक आहे तो पहा. मी दर बुधवारी न्हाते. कशी न्हाते ? ते पाहिलस मोठ थोरलं पीप ?

**चंचला :** अय्या—एवढं पीपभर का पाणी घेतेस न्हायला ?

**भामिनी :** छे—ओळख एवढ मोठ कशाला तें.

**चंचला :** हं—हं—आतां आलं लक्षांत, तुझ पाऊल पुढं कसं तें. युरोपिअन लोक लहानशा टबांत बसून अघोळ करतात; त्यांच्यावर ताण करण्यासाठी तूं या पिपांत बसून न्हातेस—होय ना ?

**भामिनी :** छे—तसं सुद्धां नाही—ओळख.

**चंचला :** आतां याच्यापुढें नाही बाई आपलं डोक चालत. काय ग आहे त्या पिपांत ?

**भामिनी** (गंभीरपणे) **:** अग, पावसाचं पाणी भरून ठेवलं आहे त्या पिपांत.

**चंचला :** पावसाचं पाणी ? (मिस्किलपणें हंसते).

*भामिनी* (गंभीरपणें) : तुला इतकं आश्चर्य काय वाटतं त्यांत ? पावसाच पाणी हें स्नानाला सगळयांत चांगलं अस सगळया शास्त्रज्ञांचं मत आहे. या पिपांतून दर आठवडयाला दोन बादल्या पाणी घ्यायचं–त्यांत सोडा बायकार्ब, नौसागर आणि अगाला लावायचा साबण मिसळायचा—

**चंचला :** न्हाण्याचं हें एक वेगळं तत्रच दिसतय—

*भामिनी* : होय तर–अग, पाणी किती तापवायचं याचेसुद्धां नियम ठरलेले आहेत ! (मासिकाचा अक काढून वाचते) " ऊन पाणी अशक्त माणसास अधिक मानवतें; तसेंच थंड पाणी स्थूल शरीरास सोसतें. साधारणतः आपल्या शरीरांत जितकी उष्णता असेल तितकीच स्नानाच्या पाण्याची असावी असें प्रमाण आहे. " (मासिक दूर ठेवीत) पाहिलंस ? एवढयासाठी मी न्हाण्यापूर्वी थर्मामिटरसुद्धा लावून पाहतें !

**चंचला** ( मिस्किलपणे ) : पण काय ग, पिपातल हे पावसाचं पाणी संपलं म्हणजे ?

*भामिनी* : लेखकानं ती अडचण सुद्धां दूर केली आहे. (वाचते) " पावसाचें पाणी सर्वात उत्तम. पण तें दुर्मिळ असल्यामुळें रोजच्या स्नानाच्या थड पाण्यांत थोडीशी भाताची पेज मिसळल्यास पाण्याचें काठिण्य जाऊन तें मऊ होतें. " हा झाला एक उपाय. हा बघ दुसरा. ( वाचते ) " पावसाचे पाणी न मिळाल्यास पाण्यांत दूध मिसळून पाण्याचा कडकपणा कमी करतां येतो. "

**चंचला :** शाबास आहे बाई तुझी. तुझं हें न्हाणं म्हणजे गोपीचंदाच्या न्हाण्याच्या वर ताण आहे. एकदम कबूल करतें कीं तुझं पाऊल फार पुढे आहे म्हणून. तुझ्या घरांत लहान मूल नाही म्हणून तुला ही रंगसंगति न् पाण्यांत काठिण्य सुचतंय्. माझं लग्न झालं नसलं तरी मी पन्नास पोरांची काळजी मागें लावून घेतली आहे ना ? तुझीं हीं शास्त्रीय पुस्तकं उघडायला सुद्धां मला वेळ व्हायचा नाही.

*भामिनी* : वा ग वा, एवढया मोठया अनाथबालकाश्रमाची सेक्रेटरी तूं. निदान बालशिक्षणावरची पुस्तकं तूं वाचलीच असशील.

**चंचला :** आमची आपली गरीब सस्था. पुस्तकं आणायला तरी पैसा हवा ना ? मग म्हणतें काय–तुझ्यासारख्या श्रीमतिणीनं हजार रुपयांची

देणगी दिली कीं होतील सगळ्या सोयी आपोआप. मग काय? किती आंकडा घालूं? दोन हजार का चार हजार—

**भामिनी :** कसली देणगी घेऊन बसली आहेस?

**चंचला :** तें नाही हं कांहीं चालायचं—थट्टा सोडली—पण निदान दीडशें दोनशें रुपये तरी घेतल्याखेरीज नाही हं मी हालणार—एवढी मुद्दाम जी मी सोलापुराहून आले आहे—

**भामिनी :** मी तुला तशीच परत दवडीन का कधीं? पण आतां जरा कठिणच दिसतंय—

**चंचला :** कांहीं कठीण नाही. भगवन्तराव कांही तुझ्याबाहेर जायचे नाहींत, माहीत आहे मला. सहज गोष्ट काढायचा अवकाश—

**भामिनी :** अग मी आतांच विचारणार होते त्यांना. पण तें भलतंच होऊन बसलंय—

**चंचला :** कांहींतरी सांगून—

**भामिनी :** कांहीतरी नाहीं—अग, सकाळपासून मोत्याचा कंठा हरवला आहे.

**चंचला :** केव्हां होता? कुठं ठेवला होतास?

**भामिनी :** काल रात्री होता. नक्की आठवतं आहे मला. थोडाथोडका नाही, चांगला दीड हजाराचा—

**चंचला :** भगवन्तरावांना समजल आहे का?

**भामिनी :** होय ना—म्हणून तर एवढ्यांतच तुझ्या कामाचं—

**चंचला :** माझं काम राहू दे ग. नीट आठव. सगळीकडे शोध. कुठें तरी ठेवला असशील—

**भामिनी :** सगळं घरदार शोधलं, सांपडणार आहे थोडाच. अग, चांगली पाळत ठेवून केलेली चोरी ती.

**चंचला :** म्हणजे?

**भामिनी** (हलक्या आवाजांत) **:** बोलूं नकोस कुठें. पण मला वेगळीच शंका येते आहे. हा जो मेला रानबोका घरांत सुळकुंड्या घालतो आहे त्यानंच या कंठ्यावर डल्ला मारला अशी माझी खात्री होत चालली आहे. अस्सा राग येतो त्याचा. वाटतं तें पीप उचलून घालावं त्याच्या टाळक्यांत!!

**चंचला :** अग तें पीप नको. त्यांत पावसाचं दुर्मिळ पाणी आहे ना!

**भामिनी :** त्याची नजर पाहिलीस का तूं? कसा भामटयासारखा कावऱ्याबावऱ्या नजरेनं—

**चंचला :** छे ग, उगाच तुला संशय येतो आहे झालं. त्याची नजर चमत्कारिक असली म्हणून काय झालं? किती झालं तरी भगवन्तरावांचा मित्र आहे.

**भामिनी :** त्यांचे सगळे मित्र हे असेच असायचे. यांचे मित्र बनायला लागतंय् काय मोठस? जुनी कुठली तरी ओळख काढून सलगीच्या, घरोब्याच्या स्वरांत चार अघळपघळ थापा मारल्या कीं जमलीच यांची गट्टी! हे धुरधर का पहिलेच मित्र आहेत? असे छप्पन धुरंधर येऊन गेले असतील आजपर्यंत. यावं, हवं तितके दिवस रहावं, मजा करावी— त्यांत या धुरधरासारखा एकादा फारच निकटचा स्नेही आला तर त्यानं जातां जातां एकादा कठासुद्धां लांबवावा. असले तर यांचे मित्र—

**चंचला :** तू कांही म्हण. निदान हा धुरधर तरी थोडासा शिकलेला दिसतोय.

**भामिनी :** असलच कसल तरी शिक्षण घेतलं असेल त्यानं. अलीकडे हवे ते धदे शिकवायच्या शाळा निघाल्या आहेत! अमेरिकेंत तर म्हणे चोरांच्यासाठी सुद्धां शाळा निघाल्या आहेत! बाकी तू शिक्षणावर जाऊं नकोस. आमचे हे— कमी का शिकले आहेत? युनिव्हर्सिटीच्या पदव्यांच शेपूट आहे; पण आहे का कांही संस्कार? त्याचेच स्नेही हे धुरधर. कंठा हरवल्या-पासून तर सोपानाला मी त्याच्यावर जास्तच पाळत ठेवायला सांगितलं आहे.

**चंचला :** सोपानाला ना? छान! पाळत ठेवायला अगदी योग्य मनुष्य शोधून काढलास! आधीच भाडखोर न् त्यांत—(सोपाना बाहेर कुणाशी तरी भाडत असल्याचा आवाज येतो) ऐकलस?— भांडतोच आहे कुणाशी तरी!

**भामिनी :** दमले बाई— कितीदां सांगायचं त्याला? त्याची खोड कांही जायची नाही. सोपाना— ए सोपाना (सोपाना येतो.) अरे कुणाशी भाडतो आहेस बाबा?

**सोपाना :** त्ये अ.ल्यात ना —

**रुक्मिनी :** अरे पण त्ये म्हणजे कोण ?

**सोपाना :** त्येंच मी इच्यारतुया की, मला इच्यारल्याशिवाय आंत घुसणारे हे एवढे तिसमारखान कोण !

**भामिनी :** मग नीट नावगाव विचारायच का असं अगावर ओरडायचं ? जा, आणखी बडबडत उभा राहू नकोस. कोण आल आहे त्यांना आंत पाठवून दे जा.

**सोपाना :** कोन म्हंजी ? तुमचे त्ये–कागदाची चिटुरी घेऊन येत्यात नव्ह का–त्ये हमाबळ–

**भामिनी :** कोण–महाबळ आले आहेत होय ?

**सोपाना :** हा, हा, हमाबळच आल्याती.

**भामिनी :** मग जा, लवकर पाठवून दे त्यांना.

**सोपाना** (जातां जातां) : आता तुमीच सागताया तवा येतों लावून. पन मुला इच्यारल्याशिवाय पुन्हां तर येऊ दे त्याला–या सोपानरावाशीं गांठ आहे म्हणावं. (जातो)

**भामिनी** (चंचलेस) : हें बघ, कंठ्याच्या चोरीच बोलू नकोस हं कुठं. (सोपाना व महाबळ येतात.) ओहो महाबळ, तुम्ही आलात होय ? तुम्हांला बराच वेळ बाहेर तिष्ठत उभं रहाव लागल ना ? या--बसा असे–सोपाना, झाडांना पाणी घातलंस का ? जा पाहू (सोपाना महाबळकडे मारक्या नजरेनें पहात जातो.) तुमची ओळख करून देते ह. हे महाबळ–इथल्या 'शखध्वनी' पत्राचे बातमीदार—

**महाबळ :** अं–अं–बातमीदार नाही–खास प्रतिनिधी.

**भामिनी :** खरंच, चुकलेच मी. बातमीदार नाही–खास प्रतिनिधी.

**महाबळ :** परवांच्या आळंदीच्या जत्रेचे खास वृत्तांत पाहिलेच असतील तुम्ही. "आमच्या खास जत्रा–प्रतिनिधीकडून" असं जाड्या मथळ्यांत छापलं होतं वर. तोच मी खास जत्रा प्रतिनिधी.

**चंचला** (शुष्कपणे हसंत) : अरे वा, असं का ? छान छान !

**भामिनी :** अन् या चचलाबाई–माझी मैत्रीण—

**महाबळ :** चंचलाबाई म्हणजे मिस् चंचला नाडकर्णी ना ?

**भामिनी :** तुमची आधींची ओळख आहे वाटतं ?

**चंचला :** आठवत नाहीं.

**महाबळ :** तुम्हाला आठवण नसेल पण मला आहे ना? ही पहा–तुम्ही सोलापुराहून काल आलांत ती बातमी सुद्धां छापली आहे आजच्या अकांत. ही पहा 'मोठ्या लोकांच्या हालचाली'तली बातमी. (वाचतो) "सोलापूर येथील अनाथबालकाश्रमाच्या उत्साही सेक्रेटरी व प्रख्यात साहित्तिक कु. चंचला नाडकर्णी या सध्या येथे आल्या असून त्यांचा मुक्काम श्री. भगवन्तराव कुलकर्णी याचेकडे आहे."

**भामिनी** (चचलेस) **:** तू तर आतां हळुहळू देशभक्त व्हायला लागलीस. पण काय ग, 'प्रख्यात साहित्तिक' ही काय भानगड आहे?

**चंचला :** छे, ग, हे काहीतरीच सांगताहेत.

**महाबळ :** भामिनीबाई, तुम्ही काय ऐकता त्यांचं? त्याचा तो विनय आहे. आमच्या "शंखध्वनी"त त्यांचा फोटो सुद्धां कित्येकदां छापला आहे आम्ही.

**चंचला :** माझा फोटो? न् तो कशाबद्दल?

**महाबळ :** तुमच्या वाङ्मयसेवेबद्दल.

**भामिनी :** पण मी रोज "शखध्वनि" वाचते पण मला नाही कधीं दिसला तो?

**महाबळ :** वास्तविक दिसायला पाहिजे. एकदां नाही चागला तीन-चार वेळां छापला होता.

**भामिनी :** अस कसं होईल? मला तर एकदां सुद्धां पाहिलेला आठवत नाही.

**महाबळ :** हां कदाचित् असं झालं असेल–तुम्हाला तो ओळखतां आला नसेल.

**भामिनी :** वा: चंचलेचा फोटो कां मला ओळखतां येणार नाही?

**महाबळ :** तसं नाहीं–पण आमच्या 'शंखध्वनी'तले सगळे फोटो सारखेच दिसतात! बायकांचे, पुरुषांचे, वनश्रीचे–कसलेहि फोटो असले तरी एकसारखे एकच दिसतात आमच्या पेपरमधें!!

**चंचला :** वा: तुमचा सोशॅलिस्ट पेपर दिसतो आहे! स्त्रीपुरुषांचे फोटो सुद्धां सारखेच!

**महाबळ :** हो. म्हणा हवं तर तसं. पण फोटोच्या ऐवजी नुसते शाईचे काळे डाग दिसतात एवढं मात्र खरं !

**भामिनी :** मग बरोबर आहे. चंचलेच्या नांवानं छापलेला शाईचा काळा डाग कोणता हें मी कसं ओळखणार ?

**चंचला :** पण मला अजून हें समजत नाहीं की, माझ्या नांवानं कागदावर शाई फांसण्याइतकी वाङमयसेवा तरी मी कुठं केली आहे ?

**महाबळ :** तसं कशाला ? तुम्हांला नेमका प्रसंगच सांगतों. मग तर झालं ? गेल्या वर्षी सोलापुरास भरलेल्या साहित्यमथनपरिषदेत तुम्ही प्रामुख्यानं भाग घेतला होता कीं नाही ?–बोला.

**चंचला :** इश्श–कांही विशेष भाग घेतला नव्हता. परिषदेच्या सुरुवातीला दोन स्वागताची पदं म्हणण्याचा कार्यक्रम होता. त्यांतल्या पाच मुलीपैकीं मी एक होते.

**महाबळ :** होय, पण त्या पांच मुलींत तुम्ही मधे उभ्या होतां की नाही? –बोला. (चचला होकारार्थी मान हालवते) आतां पटली कीं नाहीं ओळख ? तेव्हांपासून मी तुमचा चेहेरा चांगला ध्यानांत ठेवला आहे. 'शखध्वनी 'चा खास प्रतिनिधी म्हणून मीच हजर होतों ना त्या परिषदेला. ' स्वागतपर पद म्हणणाऱ्या पांच मुलीपैकी प्रमुख मुलगी ' अस ठळक हेडिग घालून तुमचा फोटो पहिल्यांदा मीच ' शखध्वनी 'त प्रसिद्ध केला.

**चंचला :** एकदरीत संपादकावर चांगलंच वजन दिसतंय तुमच. एरव्ही स्वागताचीं पदं म्हणणाऱ्या मुलीचा फोटो कसा छापून येईल ?

**भामिनी :** अग, सपादकावर वजन म्हणून काय म्हणतेस ? तुला माहीत नाही का ? हे स्वतः ' शंखध्वनी ' चे एक अष्टमांश संपादक आहेत ! बातम्या मिळविण्यांत यांचा अगदीं हातखडा आहे.

**महाबळ :** तुम्हांला आमच्या बातम्या आयत्या वाचायला ठीक वाटतं. पण त्या मिळवितांना आमचे काय हाल होतात त्याची तुम्हाला काय कल्पना येणार ? ( खिशांतून ' शंखध्वनी ' चा अंक काढून दाखवीत ) ही पहा. हिडिंबा सिनेटोनमधलं कुत्रं चोरीला गेल्याची ही चौकटींत छापलेली बातमी वाचा. अगदीं Exclusive आहे बरं का. कोण यातायात करावी लागली या बातमीसाठीं. चोरीच्या सशयावरून पकडलेल्या माणसाची

मुलाखत घ्यायला गेलों तर तो कुत्र्यासारखा माझ्यावर धांवून आला ! बरं, चोरीची अगदी ताजी बातमी मिळावी म्हणून रात्रीं हवालदाराला गांठलं तर उलट " इतक्या अपरात्री कुठं भटकतां ? " म्हणून तो माझ्याबद्दलच भलभलते संशय घेऊं लागला. त्या धांदलींत कुत्र्याचा फोटो शेवटीं नाहीं मिळाला तो नाहीच !

**चंचला :** हवालदाराला संशय आला त्यांत कांही फारसं चुकलं नाही. नाही तरी चोर न् बातमीदार यांत फारसा फरक आहेच कुठं ? एकजण जिनसा पळवतो न् दुसरा बातम्या पळवतो—

**महाबळ :** मी तर उलट असं म्हणतो कीं, चोराच्या अंगी दिसून येणारे बहुतेक सगळे गुण आम्ही बातमीदारांनी इतके पचवून टाकले आहेत की, ते पाहून चोरांनी सुद्धां लाजेनें माना खाली घालाव्या !

**चंचला :** चोरांचे गुण ? नवीनच ऐकते आहे मी—

**महाबळ :** चांगल्याला चांगलं म्हणायला काय हरकत आहे ? चोर झाला म्हणून काय झाल ? त्याचे सुद्धां कांही गुण घेण्यासारखे आहेतच. निर्भयपणा, चापल्य, धाडस, तत्त्वनिष्ठा या प्रत्येक गुणावर—

**भामिनी :** तुम्हांला भेटलेले चोर मुलुखावेगळेच दिसताहेत. आम्हांला माहीत असलेले सगळे चोर डाकू, गळेकापू—

**महाबळ :** डाकू न् गळेकापू झाला म्हणून काय झाल ? त्याला काय तत्त्वनिष्ठ राहतां येत नाही की काय ? तत्त्वनिष्ठ म्हणून जगांत शेखी मिरवणारी किती डाकू माणस तुम्हाला दाखवूं—बोला. चोरलेली वस्तु दुसऱ्याची आहे हे पक्क माहीत असूनसुद्धा ती छातीठोकपणें उचलून न्यायची—याला निर्भयपणा म्हणायचा नाही मग कशाला ? पण इतकं जरी आहे तरी आम्हां बातमीदारांची सर मात्र चोराला कधीच यायची नाहीं. जगांतील केवढीहि मोठी वंदनीय विभूति असो—तिच्यावर चवताळून, तुटून पडायचं—हें धाडस, हा निर्भयपणा फक्त आम्ही बातमीदारच करू जाणे ! चपळपणाविषयी म्हणाल तर त्या बाबतीत चोर आमच्या मागे चार दोन कोस राहील. चोर असा किती चपळपणा दाखवील ? पोलिसांचा ससेमिरा चुकविण्यासाठीं तो फार तर मोटारींतून—घटकाभर धरून चाला विमानांतून पळून जाईल; या अनंत काळावर चोराची काय हुकमत आहे ?

पण आम्ही ?—भविष्यकालाला खेचून अलीकडे आणण्याची शक्ति आमच्या लेखणीत आहे. पुढच्या आठवड्यांत होणार भाषण आम्ही आदल्या आठवड्यांत सगळंच्या सगळं—

**चंचला** (मध्येच) : अगदी कंसांतल्या हशा टाळ्यासुद्धां—

**महाबळ** : हो–हो–अगदीं कसांतल्या हंशाटाळ्यासुद्धां छापू शकतों ! इतकंच नव्हे तर प्रत्यक्ष यमाचे दूत बनून, चागल्या धडधाकट व्यक्तीला ठार मारून, मृत्युलेखाचा शिक्का त्याच्या कपाळी मारून तिच भविष्यकाळचं मरण आजच्या घटकेला जगजाहीर करू शकतो !

**चंचला** : छे बाई, दुसऱ्याच्या प्राणाशी जिथे तुम्ही ओढाताण करता तिथें इतर गोष्टीबद्दल बोलायलाच नको–दुसऱ्याच्या मालमत्तेची—

**महाबळ** : दुसऱ्याची कसली–आमची ! या पृथ्वीच्या पाठीवर आमच्या दृष्टीला दुसऱ्याच असं काही नाही ! आम्हांला जे जे दिसतं ते आमचच ! गांवांतलीं सिनेमा, नाटकं, मेजवान्या, खाने, नाचरग, तमाशे–सगळं कांहीं आमच्या कृपेमुळें सुरळीत चाललं आहे. बड्या लोकांची रहस्यं, राजकारणांतले कट, प्रेमाच्या भानगडी कितीहि खाजगी स्वरूपाच्या असल्या तरी त्या आमच्यापासून फार दिवस चोरून राहणं शक्यच नाहीं. दुसऱ्याच्या भानगडीत लक्ष घालणं हा आमचा जन्मसिद्ध हक्कच आहे मुळी !

**चंचला** : जन्मसिद्ध हक्क ! एवढे हक्कदार तुम्ही कोण ?

**महाबळ** : आम्ही कोण ?

**चंचला** : हो, हो, तुम्ही कोण ?

**महाबळ** : आम्ही कोण ? ऐका.

**आम्ही कोण म्हणून काय पुसतां ? आम्ही शिपाई गडी**
**शत्रू सांपडतां क्षणांत उडवूं त्याची पुरी रेवडी !**
**दारू कोण पितात आणि पहिली पत्नी कुणी टाकिली**
**कोणी चोरुन रोज भाविकपणें पत्रें कुणां धाडिलीं**
**कोणी फंड कसे, किती जमविले या मायभूमीस्तव**
**कोठें कोण करी हळूच कुठल्या कानांत गुंजारव !**
**हिंडे घेउन मोटरींतुनि कुणां कोणी सिनेमा नटी–**
**नाहीं या नजरेंतुनी निसटल्या ऐशा कधीं लट्पटी !**

आव्हानें, मतभेद, भांडण, शिव्या, कुत्सा, टवाळी तशी
शत्रूची-भडिमार हा करुनियां-पाडूं पुरी बत्तिशी !
टीका, वादविवाद अन् दिलगिरी, माफी, खुलासे, मतें—
तंटे, तर्कवितर्क आणि धमकी—आम्हीच त्याचे पिते !
ताशेरा, चिमटे, कलागत, तशा निर्भीड त्या गर्जना
या साऱ्या निघती सुपीक अमुच्या डोक्यांतुनी कल्पना !
आम्हांला वगळा— भकास सगळे होतील ते कॉलम !
आम्हांला वगळाल-- दैनिक दिसे निस्तेज प्रेतासम !
आम्हांला वगळा—कुठून मग तें व्याख्यान, टाळ्या, हंशा—
आम्हांला वगळा—अवास्तव तरी कंड्या पिकाव्या कशा !
थापा लोणकढी जरी पसरल्या, ठोके जरी बात मी
जें जें काय निघेल पेनमधुनी त्याची बने बातमी ! !

**भामिनी :** महाबळ, आज तुम्ही कटिंग्ज आणायला विसरलेले दिसतां; म्हणून इतर गप्पा मारून वेळ मारून नेता आहां—

**महाबळ :** वा: कटिंग्ज आणायला कसा विसरेन? तेवढ्यासाठी तर मी मुद्दाम आलो. पण दोनच आणली आहेत आज—

**चंचला :** ही कसली कटिंग्ज ?

**भामिनी :** अग, याच्या 'शंखध्वनी'च्या कचेरींत सगळीकडची वर्तमानपत्रं येतात. म्हणून त्यांचा माझा असा करार ठरला आहे की, ती सगळी पत्र त्यानी चाळायची. त्यांतल्या त्यात 'महिलाचे विश्व', 'स्त्रियाचे पान', 'स्वयपाकघरांतील कला' अशासारखी सदर लक्षपूर्वक पहायची न् त्यांतला महत्त्वाचा मजकूर कापून इथ मला आणून द्यायचा. हे पाहिलस? या पुस्तकांत यानी आतापर्यंत आणून दिलेली सगळी कटिंग्ज चिकटवून ठेवली आहेत. (महाबळास) ह दाखवा पाहूं काय आणली आहेत ती,

**महाबळ** (खिशांतून कात्रणे काढीत) : दोनच आहेत पण महत्त्वाची आहेत. हे पहा—"स्वयपाकघरांत नेहमी लागणाऱ्या वस्तूची यादी."

**भामिनी :** काय त्या यादीत जास्त सांपडायचं आहे ? मी आठवून आठवून नेहमी लागणाऱ्या जिनसा आधीच नीट लावून ठेवल्या आहेत.

**महाबळ :** पण ही यादी एकदां वाचा म्हणजे यांतल्या कित्येक जिनसांची आठवण सुद्धां कधी झाली नव्हती असं वाटेल तुम्हांला.

**भामिनी :** असं ? ऐकूं द्या तरी काय आहे एवढं तें.

**महाबळ :** ऐका हं. ( वाचतो ) " घड्याळ, थर्मामीटर, साबण बोरीक पॉवडर; सोनामुखी, एरंडेल, क्विनाइन, कॉडलिव्हर; स्मेलिंग सॉल्ट, आयोडीन, कोलन वॉटर, व्हॅसेलीन; गुलकंद, सुंठ, बाम, पिंपळी; बॅटरी, चाकू, काड्याची पेटी, दोरखड; फूटपट्टी, मेणबत्ती, उदबत्ती गॅसची बत्ती इत्यादि इत्यादि. "

**चंचला :** संपली वाटतं इतक्यांत यादी ? अन् स्वयंपाकघरांत नेहमी लागणाऱ्या त्या या जिनसा वाटतं ?

**महाबळ :** अहो, नेहमीची चिंचहळद न मीठमोहऱ्या काय कुणालाहि सहज आठवतील. पण या यादीतल्या जिनसा कुणाला आठवतील का सांगा

**भामिनी :** बरं झाल हो तुम्ही ही यादी घेऊन आला म्हणून. या यादीवरनं पाहिलं तर माझं सध्यांचं स्वयंपाकघर म्हणजे ओसाडच म्हटल पाहिजे. या सगळ्या जिनसा एकदां आणून ठेवल्याच पाहिजेत. बरं, हे दुसरं कटिंग कसलं ?

**महाबळ :** हें ना ? हें धुण्याच्या कृतीबद्दलचं आहे.

(भामिनी वाचते व सोपानाला हांका मारते. बऱ्याच हाकांनतर तो येतो.)

**भामिनी :** कुठें गेला होतास रे ? हाका तरी किती मारायच्या तुला ? बसला असशील तणतणत कुणावर तरी !

**सोपाना :** नाय बाइसाब.

**भामिनी :** चुलीत घाल तुझी ती बाईसाब—धुणं धुतलस का ?

**सोपाना :** हा धुवायाच चाललों नव्ह का—

**भामिनी :** अगदी सांगकाम्या आहे मेला. जा, धुणं आटप. (त्याला परत बोलावून) कस धुशील ?

**सोपाना :** अं—नीट धुवीन—चांगलं दगडावर हापटूनशान् !

**भामिनी :** वाटलंच मला. हे बघ, आजपासून तुझं तें दगडावर हापटनशान् पुरे झाल. आतां मी सांगते तसं धूत जा. काय—आलं का

ध्यानांत ? बघूं काय धुवायला घेतलं आहेस ? शर्ट, धोतर न् पोलकीं— इतकंच ना ? ठीक आतां असं करायचं. ऐक हं नीट. (सोपानाला समजून सांगण्याचा आविर्भाव करीत एकीकडे कटिंग वाचते.) " अदमासें दोन ग्यालन पाणी—

**सोपाना :** काय— गयालन ?

**भामिनी :** मधें बडबडूं नकोस. ग्यालन म्हणजे किती तें सुद्धां इथें लिहिलेल आहे. ऐक. (वाचने) " दोन ग्यालन किंवा अर्धा बादली पाणी मोठ्या तपेल्यांत किंवा पातेल्यांत तापत ठेवायचं. त्यात एक इंच जाडीची साबणाची वडी— बारीक तुकडे करून व दोन मुठी वॉशिंग सोडा टाकायचा." इतक आलं का ध्यानात ?

(सोपाना समजल्याप्रमाणें मान हालवतो)

**महाबळ :** इतकं चटकन ध्यानात येण्याजोगा जर त्याचा मेंदू तल्लख असता तर मघांशीं माझ्यासारख्या जबाबदार वृत्तपत्रपंडिताचा त्यानं अपमान कशाला केला असता ?

**भमिनी :** तुम्ही काय लक्ष देतां त्याच्याकडे ? तसलाच आहे तो. (सोपानास) ह पुढे ऐक. (वाचते) " इतकं झाल्यावर पाणी उकळूं लागलें की तें खाली उतरून त्यांत अगर तें पाणी रुंद भांड्यांत अगर बादलींत ओतून त्यांत धुण्याचे कपडे घालून झांकून ठेवावे. कपडे घालून विस्तवावर पाणी उकळत ठेवलें तरी चालेल" आल ध्यानांत ? (सोपाना नंदीबैलासारखी मान हालवतो.) आणि हें बघ (पुन्हां वाचते) " पाण्यांत कपडे अगदीं सैल राहतील असे भिजत घालावे. जरूर तर आणखी थोडें थड पाणी भरीस घातलें तरी हरकत नाही. पण पाण्यात कपडे पूर्णपणें दाबन न ठेवता बुडलेले असावे. कमीत कमी चार ते सहा तास कपडे पाण्यात राहिल्यावर ते धुण्यास घ्यावे. मधून मधून ते उलटसुलट वरखाली करावे; आणि कपडे दगडावर आपटण्याऐवजी एक प्रकारच्या वाटोळ्या लाटण्यानें झोडावेत." राहील का सगळं लक्षांत ?

**सोपाना :** हा— पन लाटणं कुठून आणू ? आजच्यापुरत सैपाकघरांतल घेऊं का ?

**भामिनी :** सगळं जसं तुमच्यापुढें तयार ठेवायला हवं. जा का॰ हवं तें कर.

( सोपाना 'गयालन' 'लाटणं' 'वॉशिंग सोडा' असें पुटपुट॰ दोन्ही हाताच्या वळलेल्या मुठींकडे पहात जातो.)

**महाबळ :** तुम्ही त्याला इतका पढवून धाडलात ना ? पण प्रॅक्टिक॰ करतांना तो काय काय ब्रह्मघोटाळे करील त्याचा नेम नाही. तुम्ह॰ स्वत:च जाऊन पहा.

**भामिनी :** खरंच बाई, त्याच्यावर विसंबून राहण्याची सोय नाहीं मलाच तिथं उभं राहून त्याच्याकडून सगळं करून घेतलं पाहिजे.

**महाबळ :** मी तेंच म्हणतों. तुम्हीच स्वत: जा; नाही तर तो वॉशिं॰ सोड्याच्या ऐवजी रागोळी तरी टाकील नाहीतर कपडे उकळत टाका वयाच्या ऐवजी लाटणंच उकळत्या पाण्यांत टाकील ! (भामिनी घाई घाईनें सोपानाच्या मागोमाग जाते. महाबळ समाधानाचा सुस्कारा सोडतो.)

**महाबळ :** तुमचं अनाथबालकाश्रम कस काय चाललं आहे ?

**चंचला :** ठीक चालल आहे.

**महाबळ :** चचलाबाई, आल्यापासून मी तुमच्याशीं एकांतांत बोल॰ ण्याच्या सधीचीच वाट पहात होतों. अखेर हा मठ्ठ डोक्याचा सोपानाच माझ्या मदतीला धावून आला म्हणायचा. आज मी इथें आलो तो कांही भामिनीबाईंना कटिंग्ज देण्यासाठी नव्हे. काल तुम्ही सोलापुराहून इथ आल्याचं कळल्याबरोबर तुम्हांला भेटण्यासाठी म्हणून इतक्या तांतडीन इथं आलों.

**चंचला :** तुम्ही काय म्हणतां आहां याचा मला नीटसा उलगडा होत नाहीं. मी सोलापुराहून आले हें तुमच्या कानापर्यंत जाऊन पोचावं हें एक कोडं आहे; आणि माझ्यासारख्या नवख्या बाईशी एकांतांत बोलण्यासाठी तुम्ही इथं यावं हें त्याहूनहि मोठं कोडं आहे.

**महाबळ :** यांत कोडं, रहस्य–कांहीं नाहीं. बातम्या मिळविण्याचा माझा धंदा असल्यामुळें तुम्ही सोलापुराहून आल्याची बातमी मला कळली यांत आश्चर्य कसलं ? खरं सांगायचं म्हणजे काल स्टेशनवर तुम्हांला टांग्यांत बसतांना पाहतांच मी टांग्याचा या घरापर्यंत पाठलाग केला;

'शंखध्वनी 'च्या कचेरींत बातमी दिली न् भामिनीबाईच्या ओळखीमुळं आज हा भेटायला आलों. आतां नवखेपणाविषयी म्हणाल तर तुम्ही मला मुळीच नवख्या नाही. तुमच्याबद्दलची सगळी सगतवार हकीकत मी जमविली आहे. गेल्या वर्षीं परिषदेचे रिपोर्ट लिहिता लिहितां एकीकडे हे संशोधन सुरू ठेवल होत. झालच तर तुमचे फोटो आमचे 'शखध्वनी 'त छापण्याची व्यवस्था केली. तुमच्या नावाचा वेळोवेळी ठळक टाइपांत उल्लेख केला. बोला, तुमच्या परिचयाचा याहून जास्त कोणता पुरावा पाहिजे ?

**चंचला :** बरं पण तुमच एवढं घाईच काम काय आहे तें झटकन सांगून टाका ना. म्हणजे तुम्हीहि मोकळे न् मीहि—

**महाबळ :** नाहीं–माझं काम इतक्या घाईनं होणार नाही. काम आहे तें थोडस–म्हणजे वरचंम–तसं कशाला–आपल सरळच सांगून टाकतो–माझं काम सर्वस्वी खाजगी स्वरूपाचं आहे.

**चंचला :** कामाच स्वरूप नका सागत बसूं–काम काय आहे ते बोला.

**महाबळ :** चंचलाबाई, हे जग केवळ औपचारिक व्यवहारावर चाल-लेल नमून ते सहानुभूतीच्या मृदु भावनेमुळ जिवत राहिल आहे अमं नाही तुम्हाला वाटत ?

**चंचला :** हे पहा महाबळ, मला प्रथम असं सांगा कीं, हा तुमचा प्रश्न स्वत चा खाजगी आहे की एकाद्या मुलाखतीसाठी आहे ? गवयाच गाण कोणतं आणि ओरडण कोणत हें गूढसुद्धा एक वेळ उलगडेल, पण तुम्हा बातमीदाराचा साधा प्रश्न कोणता आणि मुलाखतीपैकी कोणता हें ओळखण मात्र अगदी अशक्य आहे !

**महाबळ :** मी बातमीदाराचा पेशा पत्करला आहे खरा; पण तो केवळ बाहेरचा बुरखा आहे. वर्तमानपत्रासाठी रोज कॉलमावारी मजकूर खरडावा लागतो मला, पण—

**चंचला :** तुमचं हें आत्मचरित्र माझ्यापुढें सांगत बसायचं हाच तुमच्या भेटीचा हेतु आहे ना ? आपण हें आत्मचरित्र इथेंच थांबवू या.

**महाबळ :** हें सगळं सांगण्याचा माझा हेतु फार वेगळा आहे. आमच्या वर्तमानपत्राच्या परिभाषेंत बोलायचं म्हणजे झालीं हीं नुसतीं हेडिंगं झालीं; खरी बातमी ती याच्या पुढेंच आहे !

**चंचला :** चांगलं; पाल्हाळ लावून तेंच तें चऱ्हाट वळीत बसण्याचं तुमचं वर्तमानपत्री कौशल्य तुमच्या बोलण्यांतहि उतरलेलं दिसतय !

**महाबळ :** तुम्हांला वाटत असेल मी हें सगळ कशासाठीं सांगतों आहें. सांगतों–पण सांगण्याची जरुरी आहे का ?

**चंचला :** सांगा ना–त्याशिवाय मला कसं समजणार ?

**महाबळ :** आतांपर्यंत मी सांगितलेल्या हकीकतीवरून माझ्या खऱ्या स्वभावाची ओळख तुम्हांला पटलीच असेल.

**चंचला :** मग म्हणणं काय तुमचं ? ' शखध्वनी 'त छापण्यासाठी तुमचं एकादं शब्दचित्र लिहून देऊं ? स्पष्ट बोला. तुमच सगळं बोलण सदिग्ध. नक्की काय म्हणायच आहे त्याचा पत्ताच नाही–जसा काही एकादा अग्रलेखच खरडतां आहां !

**महाबळ** (लाजत) **:** माझ्या–माझ्या–मी–मला यंदा लग्न कर्तव्य आहे आणि त्यासाठीं मला तुमच्या सहानुभूतीची गरज आहे.

**चंचला :** ठीक आहे. माझ्याकडे कुणी स्थळांची चौकशी करायला आलं की सुचवीन तुमचं नांव !

**महाबळ :** चंचलाबाई, कां माझा असा छळ करतां आहा ? मला तुमच्याशी लग्न करण्याची इच्छा आहे.

**चंचला :** शाबास !–आतां कसं एका वाक्यात चटकन् सांगितलत ! इतका वेळ उगाचच आडवळण घेत बसलां होतां—

**महाबळ :** मुद्दामच तसं केलं. महत्त्वाची गोष्ट चटकन सांगून डोळ्यांत भरत नाहीं–बरं, माझ्या अर्जाच उत्तर ?

**चंचला :** हें पहा, मी तुमचं म्हणणं ऐकून घेतलं आहे. तुम्ही सांगितल्याप्रमाणें तुमच्यासाठीं पुरेशी सहानुभूति मी वेगळी काढून ठेवली आहे असं समजा तुम्ही.

**महाबळ :** अहाहा, या तुमच्या आश्वासनामुळं मला किती आनंद झाला आहे म्हणून सांगूं ? खुनाची बातमी हातीं आल्यानंतर सुद्धां मला इतका आनंद झाला नव्हता कधीं ! चंचलाबाई, माझी आणखी एकच शेवटची विनंति आहे.

**चंचला** (त्रासिकपणें) **:** आतां काय राहिलं आणखी ?

**महाबळ :** माझ्या अर्जाचा निकाल सवडीनं दिला तरी चालेल. पण तोंपर्यन्त माझी आठवण रहावी म्हणून माझ्या या अल्पशा नजराण्याचा स्वीकार व्हावा. (तांबड्या रिबीननें गुडाळलेली एक कागदी डबी तिच्या- पुढें ठेवतो.)

**चंचला :** हें काय ? ही लांच देतां वाटतं मला ?

**महाबळ :** लांच नाहीं. पण माझ्यानंतर आणखी कांही अर्जदारांचे अर्ज येऊन पडले तर माझा अर्ज पहिला आहे याची आठवण तुम्हांला रहावी म्हणून दिलेला हा विसार आहे अस समजा.

**चंचला :** महाबळ, हा तुमचा नजराणा तुम्ही परत न्या.

**महाबळ :** नका—माझ्या शेवटच्या विनंतीचा असा अव्हेर करू नका.

**चंचला** (कंटाळून) **:** बरं—हा तुमचा जिन्नस म्हणून मी तो ठेवीन. त्याचा मी अजून स्वीकार केला नाहीं, समजलं ?

**महाबळ :** पुढचं पुढं पाहू; सध्या तर राहूं द्या तुमच्याजवळ.

**चंचला :** पण आहे तरी काय यांत ?

**महाबळ :** हां—हां—माझ्यादेखत नाही सोडून पहायचं. मी गेल्यावर पहा. तोंपर्यंत तुमची उत्सुकता दाबून ठेवा. नाही तर आतांपर्यंतच्या सगळ्या रोमान्सवर पाणी पडेल !

**चंचला :** रोमान्स ? मी तर हा नजराणा पाहण्यांसाठीं—

**महाबळ :** ठीक आहे—चाललोंच मी ! अहाहा, स्वतःच्या प्रियेला भेटण्यासाठी तिच्याकडे धांवत येणारे अनेक प्रियकर जगाच्या पाठीवर झाले असतील; पण तिच्यापासून दूर जाण्यासाठी अधीर झालेला जगां- तला मी पहिलाच प्रियकर असेन ! जातों मी—

**चंचला :** या बरं—हळू या.

( महाबळ जातो. चंचला पेटी उघडून पाहते. आंत मोत्यांचा कंठा पाहतांच " काय ! मोत्यांचा कंठा ?" असें म्हणत महाबळ गेला त्या दिशेकडे ती आश्चर्यानें पाहते. नंतर एकदम कांही तरी कल्पना सुचून भामिनीला हांका मारीत ती घाईघाईनें स्वयंपाक घराच्या बाजूला जाते. थोड्या वेळानें भामिनी माडीवरून जिना उतरून येते, सोपानाला हाका मारते व " माझ्याबरोबर बाजारांत चल " असें म्हणते. दोघेहि बाहेर जातात. पडदा पडतो. )

# २

[ स्थळ तेच. दिवस तोच. वेळ : पहिल्या अकानतर एक दोन तासांनी धुरधर व भगवन्तराव बोलत बसले आहेत. ]

**धुरंधर :** हे पहा हं; यांत कुठं चूक राहिली नाही ना एवढं सांगा. ( भितीवरची कोष्टकें, प्रमाणदर्शके काढनो व त्याच्या जागी भितीवर खोलीचा नकाशा लावतो. ) असे दूर उभे रहा. ( भगवतरावांस दूर उभे करतो व हातांत एक छडी घेऊन नकाशा समजावून सागतो. ) हा रस्ता, हे बगल्याच फाटक. ही वाट. हा बाहेरचा दरवाजा. ही तांबडी चौकट म्हणजे तुमची खोली. आतां इकडे पहा. हीच खोली मी वेगळी काढली आहे. ही दोन दारं, या खिडक्या व इथें टेबल, हे कोच, हे पुस्तकांच कपाट अन् ही निळी फुली आहे तिथं कंठा. काय बरोबर ?

**भगवन्त :** होय, अगदी बरोबर.

**धुरंधर :** आतां विचार करा. या बाहेरच्या दरवाजानं चोर आला असं धरून चला. काय होईल ? एक तर त्या दरवाज्यांतून आलेल्या मनुष्याला पुस्तकाचं कपाट उघडं असलं तरी त्यांत काय आहे हें दिसणं अशक्य आहे. खोलीच्या या दुसऱ्या टोंकाला आल्याखेरीज त्याला कपाटांतलीं पुस्तकं दिसणार नाहींत. जो चोर चोरी करण्याच्या उद्देशानें येतो तो कोणत्याहि वस्तूला हात न लावतां उगीचच्या उगीच खोलीच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत जाईल हें संभवनीय वाटत नाहीं. निदान ही चांदीची

फोटोफरेम तरी त्यानें हातांत घेतली असती. शिवाय काल रात्री सोपाननें दार लावल्याचं त्याला नक्की आठवत आहे. तेव्हां चोर बाहेरच्या दरवाज्यांतून आला नाही हें खास. या खिडकीत चोर आला असेल का? खिडकीला लागून हें उच कपाट आहे. त्या कपाटावर 'स्त्री' मासिकांचा हा गठ्ठा, केशर तोलण्याचा हा काटा, साखर, मीठ, मसाला, हिंग, पापडखार वगैरे लेबलें असलेल्या या बरण्या, टेस्ट टयूब स्टँड, हा स्पिरिट लॅंप् अस सगळ पाकशास्त्रप्रयोगसाहित्य आहे. खिडकीतून आलेला चोर कितीहि सावधगिरीने आला तरी तो या चक्रव्यूहांत अडकलाच पाहिजे. शिवाय कपाट जवळजवळ पुरुषभर उंचीच आहे. कपाटावरून जमिनीवर उडी मारतांना आवाज झालाच असता. शिवाय ती उडी या पिपावर पडून आवाज होण्याचाहि संभव होता. दुसरं अस की खिडकीखालच्या भिंतीला कांटेरी वेल असल्यामुळें चोर तिकडून येण्याची शक्यता कमीच.

**भगवन्त०:** म्हणजे चोर आलाच नाही अस तुम्हांला म्हणायचं आहे वाटत?

**धुरंधर:** सबूर. हातीं असलेल्या पुराव्यावरून एकदम असा निष्कर्ष निघत नाहीं. फार तर इतकंच म्हणतां येईल की या दरवाज्यानें किंवा या खिडकीनें चोर येण्याचा संभव बराच कमी आहे. आतां राहतां राहिला हा दरवाजा 'क'. या दरवाज्यांत चोर आला असें धरून चाला. ही पहा ही 'क' दरवाज्यापासूनची 'ड' दरवाज्यापर्यंतची तांबडी रेघ. पाहिलीत? एकाद्या लहान मुलाला सुद्धा सहज रांगत जातां येईल. अन् या 'क' दरवाज्यांतून खोलीत सहज डोकावणारास सुद्धां हा 'ई' कंठा दिसेल. कंठा दिसतांच चोर कुठल्याहि दुसऱ्या वस्तूकडे ढुंकून पाहणार नाही. 'ई' कंठा सरळ खिशांत टाकील आणि पुन्हां 'ड–क' रस्त्यानें 'क' दरवाज्यांतून बाहेर पडेल. काय वाटतं तुम्हाला?

**भगवन्त०:** सांगितलं ना एकदां. मला तुमचं हें 'ड–क' रस्ता अन् 'ई' कंठा हें कांहीं समजत नाही! चोराला काय? सरळ वाटेनंच गेलं पाहिजे असं बंधन का आहे त्याच्यावर?

**धुरंधर:** अहो चोर झाला म्हणून काय त्याला आमचीं हीं शास्त्रीय बंधनं थोडीच झुगारून देतां येणार आहेत? आतां प्रत्यक्षच पहा हं. घटका-

भर धरून चाला मीच चोर आहे म्हणून ! हें कपाट उघडून ठेवतों. या बाहेरच्या दरवाजांतून मी आलों. हें पाहिलंत ? माझी नजर पहिल्यांदा या फोटोफरेमवर गेली. ती मी उचलली (उचलतो.) आणखी पुढें आलों. कपाटाकडे पाहिलं. कठा दिसला. हातांतली फरेम तशीच टाकून कठ्याकडे वळलो. पाहिलंत ? फोटोफरेमची जागा बदलली—अन् तुम्ही तर म्हणतां बाकीच्या सगळ्या गोष्टी जागच्या जागीं होत्या. तेव्हां हें संभवत नाही. शिवाय सोपानानं हा दरवाजा लावून घेतला होता. तेव्हा या दरवाज्यान चोर आला नाहीं. आतां या खिडकीतून—

**भगवन्त० :** नको नको, खिडकीतून उडी मारून नका दाखवू ! मला तुमचीं सगळीं अनुमानं कबूल आहेत. चोर 'क' दरवाज्यांतून 'क—ड' वाटेनं आला आणि 'ड—क' वाटेनें पुन्हा 'क' दरवाज्यातून 'ई' कठा घेऊन बाहेर पडला. त्रिवार कबूल. लहान मुलांना मुळाक्षर शिकवायला ही नवी पद्धत चांगली आहे ! पण पुढें काय ?

**धुरंधर :** ऐका. 'क' दरवाजा हा घरांतला आहे. बाहेरचीं सर्व दारें बंद असतांना चोर घरांतल्याच दरवाज्यानें गुपचुप येतो आणि तितक्याच गुपचुपपणें परत जातो यांतून निष्कर्ष काय निघतो ? एकच निष्कर्ष आणि तो हा कीं चोर घरांतलाच आहे.

**भगवन्त० :** हां ! या तुमच्या टाऊन—प्लॅनिंगच्या नकाशाच तात्पर्य आतां मला समजायला लागलं !

**धुरंधर :** चोर घरातलाच आहे हें एकदां ठरल्यानतर तो कोण हें ठरविणं फारसं कठीण नाही.

**भगवन्त०** (मध्येंच) **:** मुळींच नाहीं. मी म्हणतोंच आहे कीं चंचलेशिवाय—

**धुरंधर :** (नाकावर बोट ठेवीत) शू. नांव घ्यायचं नाही. अकगणितांतल्या उदाहरणाचं उत्तर अगदी शेवटीं मिळतं. उत्तर आधी पाहिलेलं असलं तरी तें पायरी—पायरीनं जाऊन गांठल्याशिवाय त्याचा उच्चार नाहीं करायचा.

**भगवन्त० :** होय. पण मला खाजगी रीतीनं सांगून ठेवा—या उदाहरणाचं उत्तर चंचलाच ना ?

**धुरंधर** ( हलक्या आवाजांत ) : होय. मी हें काम हातीं घेतल्यापासून जो पुरावा गोळा केला आहे त्यावरून तर माझी तशी खात्री होऊं लागली आहे. मी इथं यायच्या आधी तिच्या ट्रंका, वळकटचा सगळं सामान शोधून आलों.

**भगवन्त०** : आँ ? कांही उचलून नाही ना घेतलंत?—पुराव्यासाठीं ?

**धुरंधर** : नाही. पण कंठा कुठें सापडला नाहीं. तिच्या हातांत जी मनीबॅग आहे तिच्यांत—( " भामिनी, भामिनी, सोपाना " अशा चचलेच्या हांका ऐकू येतात.)

**भगवन्त०** : अरे बापरे ! उदाहरणाचं उत्तर आलं !

**धुरंधर** : येऊ दे. चचला यायलाच हवी आहे. ( एकदम मनांत कल्पना येऊन) हा—बस्स—असंच ! (झटपट सामान आवरूं लागतो.)

**भगवन्त०** (आश्चर्यानें) : हे काय चालवलं आहे ?

( धुरधर सामान आवरतो. उंच कपाटांतील फळ्या काढतो. एक जुनी ट्रंक उघडून त्यातून एक पेशवाईच्या काळची पगडी, मिशा वगैरे सामान काढतो. व पगडी भगवतरावांच्या डोक्यावर ठेवून त्या मिशा लावू लागतो ! )

**भगवन्त०** (दिङमूढ होऊन) : हे काय ? हे काय ?

**धुरंधर** ( दुर्लक्ष करीत व एकीकडे भगवंतरावांच्या चेहेऱ्यावर रंग लावीत.) : अगदी बोलू नका. वेळ गेला तर शिकार हातची निसटेल !

**भगवन्त०** : शिकार ? कुणाची ? तुम्ही तर माझीच शिकार चालविली आहे !

**धुरंधर** (कांहींएक न बोलतां भगवतरावाना हातानें ओढीत कपाटाजवळ नेतो; व त्यांत उभे करतो. कपाट लावून घेतो. सर्व कप्प्यांपैकीं फक्त वरच्या कप्प्याचें तावदान फुटलेले असतें. त्यांतून प्रेक्षकांना भगवंतरावाचा, पगडी, मिशा व रंगरंगोटी केलेला चेहेरा बरोबर महादजी शिंद्यांच्या बस्टसारखा दिसतो ! ) : बस्. जमल. टाळी द्या !

**भगवन्त०** (अर्धवट रागानें) : मला या कपाटांत जखडून टाकलं आहेत न् टाळी कशी देऊं ? ही काय भलतीच थट्टा ?

**धुरंधर** : ही थट्टा नाही. चालू राजकारणांतला एक डाव आहे !

**भगवन्त०** : राजकारणांतला डाव ! हं ! माझ्या बाबतीत चांगला पेंचप्रसंग निर्माण केला आहे !

**धुरंधर** : शू, बोलू नका. चचला आता येईल. ती काय बोलते, काय करते तें सगळं नीट डोळे उघडून पहा. माझ्या या महत्त्वाच्या मुलाखतीत तुम्हांला साक्षीदार करण्यासाठी ही युक्ति आहे. समजल ? तुम्ही आतां भगवंनराव नाही. महादजी शिंद्यांचा मातीचा पुतळा आहात ! समजलं ? हलायच नाही, बोलायच नाही, नुसत पाहायच, ऐकायचं न् ध्यानांत ठेवायचं. हं, ह, ते पहा, आपल सावज आलच ( कपाटाला बाहेरून कुलुप लावतो. ) आतां गप्प हं, अगदी, (घाईनें एक पुस्तक घेऊन वाचनात गढून गेल्याचा आविभाव आणतो. भगवतराव एकदां खांकरतो. धुरधर चमकून त्याच्याकडे पाहतो. भगवतराव पुतळ्यासारखा निश्चल बनतो. चंचला अतिशय घाईघाईनें येते व बाहेरच्या दरवाजाकडे जाऊ लागते.)

**चंचला** : भामिनी–अग भामिनी–सोपाना—

**धुरंधर** : इतक्या घाईतशा ? कुठे निघालांत ?

**चंचला** : मी पाहिलंच नाहीं हं तुम्हांला–अन् हें काय ? या तांबड्या न् हिरव्या रेघा कसल्या ? खरच मी विसरलेच. तुम्ही वैद्यराज आहांत नाही का ? शरीरांतल्या रक्तवाहिन्यांचा दिसतोय हा तक्ता !

**धुरंधर** : तुम्ही तर मघांपासून मला मारून मुटकून वैद्यबुवाच बनवलं आहे !

**चंचला** : तुम्ही वैद्य नाहीच तर. मग हें काय आहे ?

**धुरंधर** : हें ना ? हें जाळं—

**चंचला** : म्हणजे जाळ्याचं चित्र का काढलं आहे ? बर झालं आधी सांगितलंत म्हणून. नाही तर मला नसत ओळखतां आलं. तुम्ही चित्रकार—

**धुरंधर** : चंचलाबाई, मुख्य विषय टाळू नका. भगवंतरावांचा कठ चोरीला गेला आहे, आहे ना माहीत ?

**चंचला** : होय—

**धुरंधर** : तो कंठा चोरून नेणाऱ्या चोरासाठीं जाळं पसरलं आहे.

**चंचला** : तुमच्या कागदी जाळ्यांत सांपडण्याइतका चोर गाफील आहे अस वाटतं तुम्हांला ?

**धुरंधर :** चोर चांगला सावध आहे हो. पण आम्ही इतर मडळी सुद्धां कांही लेचीपेची नाही हें चोरानं खूप समजून असावं !

**चंचला :** हें पहा वैद्यराज–नाही–चित्रकार—

**धुरंधर :** चौर्यशास्त्रतज्ञ आहें मी.

**चंचला :** कोण ? चौर्यशास्त्रतज्ञ ? आतां आल लक्षात एवढी शास्त्रीय तयारी कसली चालली आहे ती. अस्स–तुम्ही ‘ शास्त्री ’ आहांत तर ? (नकाशा पाहात) हे काय ? ‘ ड–क ’ रस्ता न् ‘ क ’ दरवाजा ?

**धुरंधर :** हो हो. स्पष्टच सागतों ‘ क ’ दरवाजातून आंत शिरून ‘ ई ’ कठा घेऊन पुन्हा ‘ ड–क ’ रस्त्यानें चोर बाहेर पडला–का ? अचूक ओळखल की नाही ?

**चंचला :** तुमचं शास्त्रच सांगतंय–ते कसं चुकेल ?

**धुरंधर :** पण खरं ना ? वाटलच मला.

**चंचला :** पण काय हो, मी आतां या खुर्चीला हात लावला, तिला नाही का कांही नाव दिलंत ? काय म्हणायच तिला ? ‘ ट ’-खुर्ची कां ‘ ठ ’ खुर्ची ? अन् या कागदाच्या रेघोटचा म्हणजेच तुमचं जाळं ना ? या तुमच्या जाळयासमोर तुमच्या देखत देखत चोर निघून गेला तरी समजायच नाही तुम्हांला ! तुम्ही त्या रेघोटयांकडेच पाहात बसाल ! (जाऊं लागते)

**धुरंधर** ( रस्ता अडवीत ) : ती गोष्टच सोडा हो. चोर कसा निघून जातो पाहातों ना ! मारामारीची वेळ आली तरी निदान या चोराला तरी आम्ही खास हार जाणार नाहीं, समजलं ? ( एकदम ) इतका वेळ माझं लक्ष गेल नव्हत–तुमच्या हातांतली मनीबॅग काय सुदर आहे हो–पाहूं पाहूं.

**चंचला :** इतकी कांहीं चांगली नाहीं–साधी आहे.

**धुरंधर :** साधी असली तरी ते रंगीत पट्टे काय सुंदर दिसताहेत.

**चंचला** ( दूर जात ) : अंहं, जवळून नाही चांगले दिसत–लांबूनच त्याची खरी शोभा.

**धुरंधर :** न् वरचं कापड खरखरीत आहे का मऊ आहे–पाहूं.

**चंचला :** कसलं काय घेऊन बसलांत हो ! अगदी भिकार आहे मनीबॅग ही ! कालच आम्ही दोघींनी घेतल्या. पण भामिनीनं तर आणल्याबरोबर इथंच कोपऱ्यांत फेंकून दिली.

**धुरंधर** ( भामिनीची बॅग शोधीत एकीकडे ) : चंचलाबाई हा नकाशा पाहून तुम्हाला काय वाटतं? प्रत्यक्ष चोरानं जर हा नकाशा पाहिला तर चोरी करणं सोपं आहे पण ती पचवणं सोपं नाहीं असं त्याच्या ध्यानांत येईल. ( भामिनीची बॅग पाठीमागे लपवून येतो ).

**चंचला** : चोरानं हा नकाशा पाहिला तर त्याला काय वाटेल सांगू का शास्त्रीबोवा ?

**धुरंधर** : सांगा ना–तुमच्या मताला तर अतिशय किंमत देतों मी.

**चंचला** : त्याला वाटेल कीं ही चोरी पचवणं तर फारच सोपं आहे–हातांत कंठा ठेवून चोर तुमच्याशी गप्पा मारीत बसला तरी तुमच्या ध्यानांत यायचं नाही. कागदी जाळयांत कटा सापडण कधी तरी शक्य आहे ?

**धुरंधर** : शक्य आहे की नाही तें मागाहून पाहू. (एकदम) अरे, हें काय ?

**चंचला** : काय ? (थोडी पुढे होते.)

**धुरंधर** : महादजी शिंद्याचा बस्ट दिसतोय ! ( कोचावरील उशीखाली चंचलेची बॅग ढकलतो व हातांतली भामिनीची बॅग त्या जागी ठेवतो.)

**चंचला** : भामिनीनं हें ध्यान केव्हां घरांत आणल ?

**धुरंधर** : मी सुद्धां आत्तांच पाहातों आहें. बरा साधला आहे नाही ?

**चंचला** : हा महादजी शिंदे ? त्याला जर महादजी शिंदे म्हणायच तर मग कोणत्याहि बावळटावर मिशांचे कल्ले चढवून त्याला महादजी शिंदे म्हणायला हरकत नाही ! शिल्पकलेचा नमुना काय आहे पण !

**धुरंधर** : हीं असली शास्त्रं मोठीं गहन असतात. चित्र कसलं काढल आहे हें साध्या माणसाला कळेनासं झाल म्हणजे चित्रकारानें चित्रकलेची परिसीमा गांठली म्हणून समजावं ! टागोरांनी सहज बसल्या बसल्या रेघोट्या काढल्या; त्याचा त्यांना तरी अर्थ कळला कीं नाही कुणास ठाऊक! पण त्या वांकडया तिकडया रेघोटयांतूनच केवढी प्रचंड चित्रकला टीकाकारांनीं निर्माण केली आहे ! परवां मुंबईच्या प्रदर्शनांतला मामांचा पुतळा पाहिलांत कां तुम्ही ? खालीं चक्क 'माऽमा' असं लिहिलं होतं म्हणून एरव्हीं खुद्द मामांनासुद्धां तें कॉंक्रीटचं कोडं उलगडलं नसतं ! पण अस्सल शंभर नंबरी पुरोगामी शिल्पकला होती ती. त्या कॉंक्रीट-मामांच्या जातीतलाच दिसतो हा महादजी शिंदे !

**चंचला** ( कंटाळून ) : भामिनीचा पत्ता तरी काय ?

**धुरंधर :** (एकदम आठवल्यासारखें करून) हां हा. आतां आठवतंय बरं का. मला वाटतं त्या बहुतेक लोखंड बाजारांत गेल्या आहेत. अन् तिथून केमिस्टकडे जाणार असं म्हणत होत्या.

**चंचला :** लोखंड बाजारांत न् केमिस्टकडे ?

**धुरंधर :** हो. खरेदीसाठी जाणार होत्या खऱ्या. मला वाटतं आतां या वेळेला त्या केमिस्टच्या दुकानांत भेटतील तुम्हांला. तें कोपऱ्यावरचं बाटलीवाल्याचं दुकान आहे ना तेंच.

**चंचला :** मग इथें वाट पाहण्यापेक्षां तिथें भेटली तर पाहते. (घाईघाईनें धुरंधरानें ठेवलेली बॅग उचलून घेते व बाहेर जाते. धुरंधर दरवाजांत उभा राहून ती दूर जाईपर्यंत पाहात उभा राहतो. दरम्यान कपाटांतले महादजी शिंदे मोठी जांभई देतात. व 'शू शू' करून हांका मारतात. धुरंधर आत येतो.)

**भगवन्त०** (अधीरपणे) : कुलूप काढा लवकर.

**धुरंधर :** गप्प. गप्प. ती परत आली ना. (भगवंतराव एकदम पुतळा बनतो. धुरंधर मोठ्यानं हंसतो व कुलुप काढतो.) हं या बाहेर. त्या चंचलेला इतके काय घाबरतां ?

**भगवन्त०** (मिशा उतरून ठेवीत) : हें आपलं जंगल सांभाळा पाहूं आधी !

**धुरंधर :** वाः, अगदी पैज हरल्यासारखे मिशा उतरून माझ्या हातांत देता आहात !

**भगवन्त :** सोपाना बाहेरून आला की त्याला पहिलं काम सांगायचं की, हें कपाट आजच्या आज जुन्या बाजारांत नेऊन चार दोन आण्यांना विकून टाक, नाहीं तर कुणाला फुकट सुद्धां दे ! संध्याकाळला हें कपाट या घरांत दिसतां कामा नये.

**धुरंधर :** कां बुवा ?

**भगवन्त :** त्याचा काय नेम ? तुम्हीं मला रोज महादजी बनवायचे ! ही तुमची पगडी. त्यांतले सगळे ढेकूण जसेच्या तसे आहेत कां एकदां मोजून घ्या ! पायाच्या बाजूनें झुरळं आणि डोक्याच्या बाजूनें ढेकूण यांनीं असा

हल्ला चढविला होता; आणखी थोडा वेळ जास्त लागला असता तर महादजी शिंदे या कपाटांतच गारद झाला असता!

**धुरंधर :** त्रास झाला खरा तुम्हांला. पण काम पाहिलंत ना कसं फत्ते झालं तें?

**भगवन्त० :** अगोदर नाही कबूल करणार. ती मनीबॅग उघडून पहा. आंत कठा असला तर ठीक आहे. नाहींतर आमची ही आत्तांची तपश्चर्या फुकट जायची. ( धुरंधर मनीबॅग उघडून त्यातून कागदाची पुडी काढतो. पुडी उलगडून त्यांतील कंठा काढतो.) अहाहा! हाच तो कठा! मारुतिराया, तुला पैशाची खडीसाखर बोललों होतों. तुझीच कृपा ही. जय बजरग!

**धुरंधर :** काय भगवन्तराव? माझ्या सामर्थ्याबद्दल तुम्हाला संशय येत होता ना? आतां पटली का खात्री?

**भगवन्त :** नाही तशी माझी पहिल्यापासून खात्री होतीच.

**धुरंधर :** पाहिलंत? हा नकाशा–हें अनुमान–ही चचला–अन् हा कठा!

**भगवन्त० :** अगदीं हा सूर्य न् हा जयद्रथ!

**धुरंधर :** तुम्ही साक्षीदार आहात–कदाचित् ती माझ्यावर उल्टेल कीं तुम्हीच कंठा चोरलात् अन् माझ्यावर आळ घेतांय म्हणून.

**भगवन्त० :** त्याची नको आतां काळजी. मी प्रत्यक्ष पाहिल्या आहेत ना सगळचा गोष्टी. मला चंचलेबद्दल संशय होताच पहिल्यापासून. न् मघाशी तर मला तिचा असा राग आला. माझ्या तोंडावर माझा अपमान?

**धुरंधर :** तो केव्हां?

**भगवन्त० :** मघाशीं नाहीं का ती म्हणाली कीं कुणाहि बावळटाल मिशा लावून महादजी बनवावं म्हणून! म्हणजे मी बावळट!

**धुरंधर :** छे हो. तिनं आपलं उदाहरणं घेतलं. तुम्हांला कोण बावळट म्हणेल?

**भगवन्त० :** आतां हिला येऊं दे, म्हणजे सांगतों हिच्या मैत्रिणीचे प्रताप

**धुरंधर :** (एकदम विचार करून) भगवंतराव, धोका आहे.

**भगवन्त० :** धोका? कसला?

**धुरंधर :** म्हणजे असं कीं चंचलेच्या बॅगमधला कंठा नाहींसा झाल्याच

तिच्या आतां लक्षात येईल. आपल्या हातांत आतां तिच्या विरुद्ध सगळा पुरावा आहे हें ती ओळखेल. न् मग परत घरीं न येतां परस्पर स्टेशनवरून पसार होईल.

**भगवन्त०** : पण तिच बाकीच सामान आहे ना इथ ?

**धुरंधर** : सामान तें काय ? रोजचे कपडे ना ? ते परत नेण्यासाठी आपण होऊन आपल्या हातीं सांपडण्याइतकी का ती अजाण आहे ?

**भगवन्त०** : मी म्हणतों आता जाई ना का ती मसणात. आपला कंठा आपल्याला परत मिळाला. बस् झाल.

**धुरंधर** : वा:, भामिनीबाईंना आपल म्हणण खरं वाटायच नाही. त्या माझ्यावरच आळ घेतील.

**भगवन्त०** : मी आहे ना तुमच्या बाजून साक्षीदार? मी स्वच्छ सांगेन–

**धुरंधर** : तुम्ही खूप स्वच्छ सागाल; पण तुमच्या स्वच्छ सांगण्यावर आजपर्यंत कधी भामिनीबाईंनी विश्वास ठेवला आहे का ?

**भगवन्त०** : हो तेही खरंच !

**धुरंधर** : म्हणून या सगळ्या प्रकरणाची रुजवात, शहानिशा झाल्या-खेरीज चचलेला आपण इथून हलूं देता कामा नये.

**भगवन्त०** : पण ती तर आधीच हालली आहे !

**धुरंधर** : म्हणूनच सांगतों की, धोका आहे. तुम्ही तिच्या मागोमाग जा. कुठे कुठे जाते दुरून पहा. आपण होऊन घरी परत आली तर ठीकच आहे. पण स्टेशनवर जायला लागली की वाटेल ते करून तिला परत आणा.

**भगवन्त०** : ठीक आहे. तुमच्या या गुन्हेगार शास्त्रांतले बरेचसे धडे शिकवायला लागलांत की ! बाकी हें सगळ शास्त्र मला चांगलंच शिकायला हवं. दर पधरवड्याला आमच्या बाईसाहेब कांही ना कांहीतरी बोळवून बसायच्या ! त्यांनी हरवायचं अन् आम्ही शोधीत बसायचं ! तेव्हां—

**धुरंधर** : चला आटपा–वेळ घालवू नका. नाही तर ती गुगारा देऊन जायची.

**भगवन्त०** : ती गोष्ट सोडा. सोलापुरास जाऊन घेऊन येईन तिला !

( भगवन्तराव जातात. चंचलेच्या बॅगमधून कठा काढून धुरंधर

त्याकडे पाहात बसतो. भामिनी व सोपाना बाहेरून येतात. धुरधर कंठा बॅग-मध्यें ठेवतो. सोपाना डोक्यावरचा हारा तेथेच ठेवून जातो. )

**भामिनी :** काय चाललंय ?

**धुरंधर :** मी भगवंतरावांचीच वाट पाहात बसलों आहें.

**भामिनी :** हो, मलाही आतां यायला हवेच आहेत ते.

**धुरंधर :** हें पहा तुमच्याजवळ आत्तां स्पष्ट बोलायला हरकत नाही.

**भामिनी :** बोला, खुशाल स्पष्ट बोला, मी सुद्धां स्पष्टच बोलणार आहें.

**धुरंधर :** आपल्याच घरांतल्या पाहुणा म्हणून आलेल्या माणसाच्या हातून हें असं व्हावं याचं मला सगळ्यांत वाईट वाटतं !

**भामिनी :** मला सुद्धां फार वाईट वाटतं—पण पाहुणा झाला म्हणून काय झालं ? नाइलाजानं पुढच्या सगळ्या गोष्टी करायलाच हव्या.

**धुरंधर :** मैत्रीचं नातं बाजूला ठेवून तुम्ही इतक्या न्यायनिष्ठुर व्हाल अशी माझी कल्पना नव्हती.

**भामिनी :** मित्र मित्र म्हणविणाऱ्यांच्या हातूनच हीं असली मैत्रीची कामं होतील अशी माझी तरी कुठं कल्पना होती ?

**धुरंधर :** पण भामिनीबाई, एकदमच इतक्या थराला हें प्रकरण येऊं नये असं माझं प्रामाणिक मत आहे !

**भामिनी :** पण चोराला मुद्देमालासकट पकडल्यानंतर त्याला मोकळा सोडूं नये असं माझंसुद्धां प्रामाणिकच मत आहे त्याला काय करायच ?

**धुरंधर :** मोकळा नका सोडूं. माझं म्हणणं इतकच की, पोलिसांना बोलावण्याऐवजी घरच्याघरींच थोडा धाकधपटशा दाखवून पाहावा.

**भामिनी :** ठीक आहे. तुम्हीच सुचविलं हें बरं झालं ! पाहुण्याच्या आवडीनिवडीकडे लक्ष नको का द्यायला ! सोपाना—

( सोपाना जवळ येतांच ती त्याच्या कानांत हलकेच कांहीतरी सांगते. सोपाना मुकाट्यानें त्या सामानांतून एक मोठा दोर काढतो व संथपणें धुरंधर खुर्चीवर बसला असतांना त्याला तसाच दोरानें खुर्चीला बांधून ठेवतो.)

**धुरंधर :** हें काय भामिनीबाई ?

**भामिनी :** ही आमच्या घरच्या पाहुणचाराची थोडीशी चुणूक !

**धुरंधर :** ही काय भलतीच थट्टा! तुमच्या घरचा कंठा चोरीस गेला. मी आपलेपणानें तुम्हांला मदत करायला गेलों; त्याच हें बक्षीस! चांगल! अन् त्यांतून आता तर खरा चोर सांपडला आहे. मग उगाच कां माझा छळ? मला आधीं मोकळा करा म्हणजे–

**भामिनी :** म्हणजे पळून जायला बरं, असंच ना?

**धुरंधर :** मी कशाला पळून जाऊं? हवं तर यापुढं एक वर्षसुद्धां ऱ्या घरांत राहायला मी कबूल आहे!

**भामिनी :** असाल तर काय झाल? फुकटचं दोन्ही वेळचं हादडायला मिळतंय्. कांही काम धंदा करायला नको. पुन्हां मालकाचे स्नेही म्हणून आल्यागेल्याबद्दल हवे ते तर्कंकुतर्क काढायला मोकळीकच!

**धुरंधर :** चंचलाबाईनीं जर खरोखरीच–

**भामिनी :** चूप! हें पहा, आतां कांहीं गमजा चालणार नाहीत. मी आज दोन तीन दिवस गप्प बसले होते. पण आतां गोष्टी जास्तच थराला जायला लागल्या. मुकाट्यानं कबूल करा न् मोकळे व्हा.

**धुरंधर :** काय कबूल करा?

**भामिनी :** तुम्ही कठा चोरलांत कीं नाही?

**धुरंधर :** आतां कशी खात्री पटवू? नाहीं हो! तुमची शपथ नाहीं.

**भामिनी :** (टेबलावरची मनीबॅग उचलून घेत) ही मनीबॅग तुम्हांला कुठें मिळाली?

**धुरंधर :** मला नाहीं मिळाली.

**भामिनी :** या टेबलावर तुम्हीच ठेवलीत ना?

**धुरंधर :** हो.

**भामिनी :** ही कुणाची आहे?

**धुरंधर :** चंचलाबाईंची—

**भामिनी :** कशाला खोटं बोलतां उगाच? तिच्याजवळ अशीच एक दुसरी आहे.

**धुरंधर :** होय ती तुमची!

**भामिनी :** बरेच चलाख दिसतां कीं! माझ्या खोलींतली मनीबॅग

चंचलेची अन् चंचलेजवळची ती माझी ! खर सांगून टाका ना की खोलीत मी टाकून दिलेली मनीबॅग तुम्ही उचललीत म्हणून—

**धुरंधर :** होय.

**भामिनी :** बायकी मनीबॅग तुम्हाला हो कशाला ?

**धुरंधर :** तसंच महत्त्वाच कारण होतं !

**भामिनी :** मी सांगते ना ते महत्त्वाच कारण. तुम्ही चोरलेला कठा या बॅगमध्ये घालून ही बॅग चचलेच्या सामानांत ढकलायची. तिची रिकामी बॅग इथे आणून ठेवायची न् अशा रीतीनें बिचाऱ्या चचलेवर चोरीचा आळ घालावयाचा. होय ना ?

**धुरंधर :** नाही हो, माझ्याजवळ कंठा नाही. (भामिनी संथपणें मनी-बॅग उघडून पुरचुडी सोडून कठा काढते.)

**भामिनी** (कठ्याकडे पाहात) **:** खरंच तुमच्याजवळ कुठून असणार कठा ? सोपाना, (तो हातांत एक काठी घेऊन येतो.) सोपाना, जरा पोलिस चौकीवरून जाऊन ये बरं !

**धुरंधर** (घाबरून) **:** भामिनीबाई—नाही—मी नाही—अरे सोपाना, जरा थांब ! मी चोर नाही—सोपाना—सोपानदेव—मी चोर नाही हो !

**भामिनी :** तुम्ही चोर आहांत असं मी कुठं म्हणते ? ज्याच्याजवळ कंठा सांपडेल तो ठरेल चोर !

**धुरंधर :** भामिनीबाई, मी तुमच्या पायां पडतो. सोपाना, हवं तर तुझ्याहि पाया पडतो ! हवं तर मला हवा तितका वेळ असा बांधून ठेवा, पण पोलिसांना बोलावू नका !

**भामिनी :** कां ?

**धुरंधर :** तो तत्त्वाचा प्रश्न आहे ! मी वाटेल त्या हालअपेष्टा सहन करीन; हव्या त्या भयंकर दिव्यांतून जावं लागलं तरी जाईन; पण पोलिस-समोर अपराधी म्हणून कधीही उभा राहणार नाहीं ! गुन्हेगारशास्त्राचा श्रीगणेशासुद्धां ज्याला येत नाहीं त्याच्यासमोर त्या शास्त्रांतल्या माझ्या-सारख्या महान् पंडितानं जाब द्यायला उभं राहायचं ? अशक्य ! धर्मासाठीं संभाजीनं मरण पत्करलं तसं तत्त्वासाठी मीसुद्धां हें बंधन मोठ्या खुषीनें पत्करीन ! बांधा ! खुशाल बांधा मला !

**भामिनी :** वा: ! कंठा चोरण्याचं केवढं मोठं तत्त्व न् त्यासाठीं केवढा हा स्वार्थत्याग ! बर, तसं का होईना. सोपाना, थांब. हे बाकीचे दोर, हा पेट्रोमॅक्स सगळं घेऊन स्वयंपाकघरांत चल. महाबळांनी आणून दिलेल्या यादीप्रमाणे स्वयपाकघर लावून टाकतें एकदां. धुरंधर, बसा हं जरा असेच.

(सोपाना सामान घेऊन जातो. त्याच्या मागोमाग भामिनीबाई स्वयंपाकघरांत जातात. धुरंधर शून्य दृष्टीनें बराच वेळ समोर पहात बसतो. एकदां खूप श्वास कोंडून घेतो व "बंधनाच्या पलीकडे" असें मोठ्यानें म्हणत सुटण्याचा प्रयत्न करतो. पण तो निष्फळ ठरतो. हताश होऊन "छे, बंधनांतच" असें असहायपणें म्हणतो व मान खाली टाकून बसतो. थोडया वेळाने महाबळ दबत दबत पावलें टाकीत येतो. त्याच्याकडे धुरंधराचें लक्ष नसतें. धुरंधराचा अवतार बघून महाबळ आश्चर्यचकित होतो. घाईघाईनें खिशांतून वही व पेन्सिल काढून तो भराभर टिपणें करूं लागतो. त्याची चाहूल लागून धुरंधर वर पाहतो.)

**महाबळ :** नमस्कार. हें काय चाललंय ? (धुरंधर रागानें त्याच्याकडे पाहात राहतो.) म्हटलं काय चाललंय ?

**धुरंधर :** तुम्हांला काय दिसतय ?

**महाबळ :** रागावूं नका. विचारायच कारण असं की मला वाटलं तुम्ही कसल्या तरी योगांतल्या पथातले दिसता ! हठयोग म्हणा—शठयोग म्हणा—

**धुरंधर :** शठयोग ? एका शठाशी गांठ पडण्याचा योग मात्र आला आहे खरा !

**महाबळ :** पण माझा तर्क खरा ना ? हें योगांतलंच कांही तरी प्रकरण दिसतंय ! (टिपून घेऊं लागतो.)

**धुरंधर :** टिपून काय घेतां आहां ?

**महाबळ :** तुमचे योगाभ्यासाचे अनुभव ! बोला, बोला, मी अर्धी-अधिक माहिती लिहिलीसुद्धां !

**धुरंधर :** कसली माहिती ? योगाची ?

**महाबळ :** होय. ही पहा, सुरुवातीची माहिती (टिपून घेतो) 'मी मुलाखतीला गेलों तेव्हां श्री. धुरंधर एका आसनांत मग्न झाले होते !'

**धुरंधर :** आसनांत ? अन् मग्न झालों होतों ?

**महाबळ :** मी आलों तेव्हां तुम्ही खाली मान घालून चिंतन करीत नव्हतां का बसलां? आमच्या वर्तमानपत्री भाषेत त्याचं थोडंसं रसभरित वर्णन! नंतर तुमचे अनुभव— (भामिनी येते.)

**भामिनी :** काय महाबळ? काय चाललं आहे?

**महाबळ :** यांची मुलाखत घेतों आहें.

**भामिनी :** यांची ना? अवश्य घ्या. फार चटकदार मुलाखत होईल!

**महाबळ** (धुरंधराकडे वळत) **:** पाहिलंत? हा पहा आणखी एक साक्षीदार मिळाला. आतां काही एक सबबी चालायच्या नाहीत. हं, करूं सुरुवात? पहिला प्रश्न—

**धुरंधर :** महाबळ, तुमचा भयंकर गैरसमज होतो आहे. तुम्ही म्हणतां तसा मी नाहीं!

**महाबळ :** छे छे!—हा आपला विनय आहे. मी म्हणतों तसे तुम्ही आहांत! मी कोण आहे? बातमीदार, समजलां? बातमीदारानं केलेली माणसाची पारख कधीं चुकायची नाही! तसं कशाला? आपण भामिनी-बाईंनाच विचारूं. काय हो, मी यांची मुलाखत मागतों आहें यांत कांहीं चूक आहे का?

**भामिनी :** छे, मुळींच चूक नाहीं. मी तर म्हणते यांची मुलाखत नाहीं घ्यायची मग कोणाची?

**महाबळ :** झालं तर, बोला. तुमच्या योगाभ्यासाला केव्हांपासून सुरुवात झाली?

**भामिनी :** योगाभ्यास! (मोठ्यानें हंसूं लागते) हें मात्र मलासुद्धां माहीत नव्हतं!

**महाबळ :** माहीत नव्हतं? मग हें काय आहे? हें—हें बद्धासन!

**भामिनी :** बद्धासन? नवीनच दिसतंय आसन हें!

**धुरंधर :** (भामिनीस) तुम्ही काय ऐकतां त्यांचं? कसला योगाभ्यास न् कसलीं आसनं! हें काय आहे तें तुम्हांलाच जास्त माहीत आहे!

**महाबळ :** अस्सं. म्हणजे भामिनीबाईंनासुद्धां यांतलं थोडं फार गम्य आहे वाटतं? ठीक आहे. तुमची सुद्धां मुलाखत घेऊन टाकूं! (लिहून

घेत ) 'मी श्री. धुरंधर यांना भेटायला गेलों त्या वेळीं 'बद्धासन' त्यांनीं मला एका क्षणांत करून दाखविलें!'

**धुरंधर :** महाबळ, कृपा करून हें भलतसलतं छापूं नका! योगाची अन् माझी तोंडओळख सुद्धां नाहीं! बद्धासन कशाशीं खातात हें मुद्धां मला माहीत नाहीं!

**महाबळ :** तुम्हांला माहीत नसलं म्हणून काय झालं? मुलाखतीत प्रसिद्ध होणाऱ्या सर्व गोष्टी मुलाखत देणाऱ्याला माहीत पाहिजेत असं कुणीं सांगितलं आहे? परवांच मोठी गंमत झाली. आमच्या संपादकांनीं आम्हांला हुंडणावळीवर कोणाची तरी मुलाखत घ्यायला सांगितली. आम्ही तडक गेलों. कुणाकडे? सहा मुलीचीं लग्नं उरकून उरलेल्या तीन मुलीचीं लग्न जुळविण्याच्या फिकिरींत असलेल्या एका मुलीच्या बापाकडे! त्याचं होतं काष्ठौषधीचं दुकान!

**भामिनी :** शाबास! तो हुंडणावळीवर काय बोलणार कपाळ?

**महाबळ :** तें थोडंसं आमचंच चुकलं–आम्हांला वाटलं हुंडणावळ म्हणजे कांहीं हुंड्याबिंड्याची भानगड दिसते आहे! म्हणून हा नऊ पोरीचा बाप गांठला! पण तें निघालं भलतंच!

**भामिनी :** मग हुंडणावळ सोडून हुंड्यावरच मुलाखत घेतलीत?

**महाबळ :** छे हो. मग आमचं कौशल्य तें काय? चांगली साडे चार कॉलम मुलाखत अन् ती सुद्धां हुंडणावळीवरच घेतली! तो म्हणाला, मला यांतलं कांहीं कळत नाहीं. मी सांगितलं, मला तरी कुठं कळतंय? कळत असतं तर तुझ्याकडे कशाला आलों असतों! शेवटीं इकडच्या तिकडच्या चार थापा मारल्या न् भरले कॉलम्!

**भामिनी :** पण लोकांनीं कसं समजावं ही हुंडणावळीवरची मुलाखत म्हणून?

**महाबळ :** अहो वर जाड्या मथळ्यांत ढळढळीत छापायचंच ना! 'हुंडणावळीबद्दल सामान्य नागरिकांस काय वाटतें?" असं चक्क वर हेडिंग टाकलं म्हणजे झालं! या धुरंधरांच्या मुलाखतीचं असंच करायचं. वर हेडिंग घालयचं–" महाराष्ट्रीय योग्यानें शोधून काढलेलें बद्धासन "

**भामिनी :** महाराष्ट्रीय योगी न् बंगाली योगी यांत फरक असतो वाटतं?

***महाबळ :*** त्यांत आमच्या संपादकांचं राजकारण आहे! 'महाराष्ट्रीय' हा शब्द मधून मधून शिपडीत शिपडीत आम्हांला लिहावं लागतं ! हा प्रांताभिमान आहे. आमचे संपादक सिंगल चहा मागवतात ते सुद्धां महाराष्ट्र—भुवनांतूनच ! म्हणून 'महाराष्ट्रीय योगी' असं सुरुवातीला म्हटलेलं असलं म्हणजे मग एकाद्या चोराची मुलाखत छापली (धुरंधराकडे पहात) म्हणजे मी तुम्हांला चोर म्हणतों असें समजूं नका तुम्ही. पण आपलं एक उदाहरण सांगितलं. मग काय? हें बद्धासन नांवाचं नवीन आसन तुम्ही कल्पकतेनं शोधून काढलं असं लिहितों. या तुमच्या आसनाचा एक फोटो घेऊन तोसुद्धां देतों छापून. पत्रांतील तेवढी जागा भरून निघेल ! ही मुलाखत संपली कीं आमच्या शंखध्वनीच्या खास फोटोग्राफरकडून तुमच्या या आसनाचा एक फोटो काढून घेतों.

***भामिनी :*** फोटोच्या खर्चांत कशाला पडता ?

***महाबळ :*** वा! फोटोशिवाय मुलाखत छापायची? कॉलेजला मुलीशिवाय जशी मजा नाहीं, भांडणावांचून संमेलनाला जसा रंग नाहीं, सोड्यावांचून व्हिस्कीला जशी चव नाहीं, रुसण्याफुगण्यावांचून लग्नाला जशी गंमत नाही, तशी फोटोवांचून मुलाखतीला खुमारी नाही ! फोटोवांचून मुलाखत छापणं हा आमच्या वर्तमानपत्राच्या धंद्यांतला फार भयंकर गुन्हा आहे. या फोटोसाठीं आम्हांला किती कष्ट पडतात म्हणून सांगूं ? चार महिन्यांपूर्वींची गोष्ट. त्या हिडिंबा सिनेटोनमधील ती 'इस्टार'—चंद्रिका—तिची मुलाखत आम्ही छापली. आदल्या दिवसापर्यंत तिच्या फोटोचा पत्ताच नाही. अगदी लेटेस्ट फोटोग्राफ पाहिजे म्हणून आम्ही आमचा खास फोटोग्राफर पाठवला. पण तिचा नट्टापट्टाच सरेना! तिच्या 'प्रेमवीर' चपला आयत्या वेळीं तुटल्या! तिचं तें 'हृंटरवाली' पातळ नेसण्यांत न् 'अमृतमंथन' वेणी घालण्यांत तिनं इतका वेळ घालवला कीं आमचा फोटोग्राफर जागच्या जागीं खलास झाला ! नव्या फोटोचा असा विचका झाल्यामुळें तिनं जुने फोटोसुद्धां रागावून दिले नाहींत. झालं. आमच्यापुढें मोठाच प्रश्न उभा राहिला. शेवटीं काय केलं—गेल्या वर्षीं शिशुसंगोपनप्रदर्शनांत बक्षीस मिळालेल्या एका दीड वर्षाच्या मुलीचा फोटो होता; तोच दिला दडपून! न् खालीं लिहिलं —'मिस् चंद्रिका यांचा लहानपणचा दुर्मिळ फोटो—खास शंखध्वनीसाठीं !'

**भामिनी :** छान छान—पण इतके तरी श्रम कशाला? यांच्या फोटोच्या जागीं शाईच पसरून ठेवा म्हणजे झालं! बाकी—बद्धासनांतला यांचा चेहेरा खरोखरीच फोटो काढण्याजोगा आहे खरा!

**महाबळ** (लिहून घेत): 'श्री.धुरंधर हे बद्धासनांत कितीतरी वेळ राहूं शकतात. माझ्याशीं बोलत असतांना ते सारा वेळ बद्धासनांतच होते. त्यांची मुद्रा अत्यंत प्रफुल्लित आणि चेहेरा अतिशय हंसरा आणि शांत दिसत होता.'

( धुरंधर रागानें महाबळकडे पाहतो. भगवन्तराव घाईघाईनें कपाळावरील घाम पुशीत येतात. )

**भामिनी :** हा काय प्रकार आहे?

**महाबळ :** या भगवन्तराव, वेळेवर आलांत. धुरंधर आम्हांला एक आसन करून दाखताहेत!

**भगवन्त० :** काय हो धुरंधर, आमच्या घरांत जी रोज नवी नवीं खुळं निघतात त्यांना तुम्हींही बळी पडतां वाटतं?

**धुरंधर :** हें खूळ माझं नाही ( भामिनीकडे बोट दाखवून )यांचं आहे.

**भगवन्त० :** वाटलंच मला ( भामिनीस ) हें पहा, तुमचे हे योग-साधनेचे प्रयोग बस्स करा. ह्या बिचाऱ्या धुरंधरांना कां बांधून ठेवलं आहे?

**भामिनी :** हे धुरंधर बिचारे? बरे असतील बिचारे—

**भगवन्त :** मग काय ती चंचला भोळी बिचारी वाटतं?

**भामिनी :** तिचं कशाला नांव घेतां उगाच? तुमच्या मित्राला तुम्हीच विचारा सगळं.

**महाबळ :** हें पहा कुणाला कांही विचारायचं असेल तर मला सांगा. आम्ही बातमीदार वाटेल त्याला वाटेल तें विचारायला कधीं कचरणार नाहीं!

**भगवन्त० :** त्यांना कांहीं विचारण्याची जरूरीच नाहीं. मी सगळं कांहीं प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहिलं आहे.

**भामिनी :** होय ना—मग वादच मिटला. तुमच्या मित्राबद्दल मी कितीही जीव तोडून सांगितलं असतं तरी खोटं वाटलं असतं. आतां परस्पर खात्री पटली म्हणून बरं झालं—

**धुरंधर :** भगवन्तराव, मी आधींपासून म्हणत नव्हतों—

**भगवन्त० :** तुम्ही अगदीं स्वस्थ रहा. हिनं आपल्या मैत्रिणीची कितीहि तरफदारी केली तरी खरी गोष्ट फार वेळ लपून राहात नसते. सोपाना, ( सोपाना येतो ) तो दोर सोडून टाक पाहूं अगोदर. (सोपाना दोन वेढे सोडतो.)

***भामिनी :*** थांब सोपाना, पुन्हां बांधून ठेव, (सोपाना पुन्हां बांधतो) हें पहा प्रत्यक्ष डोळ्यांनीं सगळ्या गोष्टी पाहिलेल्या असून तुम्ही डोळ्या-वर कातडं ओढून—

**भगवन्त० :** प्रत्यक्ष सगळं पाहिलं आहे म्हणून सांगतों आहे. सोपाना, दोर सोड (सोपाना दोन वेढे सोडतो.)

***भामिनी :*** काय म्हणून ? हातांत चक्क पुरावा आहे तरी डोळेझांक काय म्हणून करायची ? तें कांही नाहीं. सोपाना, (सोपान पुन्हां बांधतो.)

**महाबळ :** वा: वा: मुलाखत अशी रगणार आहे की यँव् ! साडेचार कॉलमचे चांगले आठ कॉलम होणारसं दिसतं! अन् या सोपानानं तर या आसनांत असं कलासौंदर्य निर्माण केलं आहे! कसं बरं वर्णन करावं ? हां असंच. 'गोप आणि गोपी टिपऱ्यांचा नाच खेळतांना; ज्या कौशल्यानं, चापल्यान आणि तालबद्धतेनं गोफ विणतात आणि सोडवितात, पुन्हा विणतात आणि पुन्हां सोडवितात तितक्याच आकर्षकतेनें श्री. धुरंधर आणि त्यांचे सहकारी श्री. सोपानदेव हे आसन करीत आणि उलगडून दाखवीत!' वा: छान जमल!

**भगवन्त० :** पण चोर सोडून संन्याशाला सुळी द्यायचा हा न्याय कुठला ? (सोपाना वेढे सोडतो.)

***भामिनी :*** संन्याशाचा नुसता आवच आहे—खरा चोरच आहे (सोपाना वेढे घट्ट करतो.)

**महाबळ :** थांबा काय म्हणालांत तुम्ही ? चोरी ?

**भगवन्त० :** हो, मग काय भीति आहे काय ?

**महाबळ :** कुणाची चोरी ? कसली चोरी—बोला लवकर—एक एक पळ म्हणजे युगासारखं आहे !

**भगवन्त० :** आमच्या घरांतला कंठा सकाळीं चोरीला गेला आहे.

**महाबळ :** सकाळीं ? मग इतका वेळ कां नाही सांगितलंत ? ( जाऊं लागतो.)

**भगवन्त० :** थांबा–कुठं चाललां ? पोलिस ठाण्यावर ?

**महाबळ :** नाहीं–नाहीं. पोलिस ठाण्यावर नाहीं. शंखध्वनीच्या कँचेरीत ! आधी ही चोरीची बातमी देऊन येतों स्टॉपप्रेससाठीं. उशीर झाला तर आमच्या फुरसुंगी एडिशनला नाहीं जायची ! (घाईघाईनें जातो.)

**धुरंधर :** भगवन्तराव, मी हवा तर गुन्हा कबूल करतों. पण माझे हे हाल थांबवा.

**भामिनी :** पाहिलंत–ऐका—

**भगवन्त० :** छे छे, गुन्हाच केला नाही न् कबूल काय करतांय् उगाच ?

**भामिनी :** नाणंच खोटं. त्याला तुम्ही काय करणार ?

**भगवन्त० :** झाला इतका प्रकार फार झाला–मुकाटयानं सांग, चंचला कुठं आहे ?

**भामिनी :** बाहेर गेली आहे.

**भगवन्त० :** बाहेर म्हणजे कुठे ? पसार झाली–होय ना ?

**भामिनी :** पळून कशाला जाईल ? सगळयांचेच मित्र कांहीं सारखे नसतात. हें पहा, तुम्ही एकदा यांना विचारा पाहूं या मनीबॅगमधें काय आहे म्हणून—

**भगवन्त० :** त्याला कशाला विचारतेस ? मी सांगतों काय आहे ते. या मनीबॅगमध्यें कंठा आहे हे मला माहीत आहे. थांबा, मीच दाखवितों (बॅगमधून कंठा काढतात व पुन्हां ठेवतात.)

**भामिनी :** आतां विचारा, त्यांना कुणी ठेवला त्या बॅगमध्ये ?

**भगवन्त० :** त्यांत काय आहे–चंचलेनं !

**भामिनी :** साफ खोटं–धुरंधरांनी !

**भगवन्त० :** चंचलेनं ठेवला.

**भामिनी :** नाहीं–ठेवणारे गृहस्थ हे !

**भगवन्त० :** मग चंचला पळून कां गेली असती? त्याचं कारण हेंच कीं तिनं केलेली चोरी उघडकीला येईल अशी तिला भीति वाटली म्हणून ती पळाली.चंचलेन हा कंठा चोरला, तिनं आपल्या बॅगमध्यें लपवला–धुरंधरांनीं युक्तीनें तिच्याकडून काढून घेतला.

**भामिनी :** माझा विश्वास बसत नाहीं. मी असंच म्हणणार, धरंधरांनीं

कंठा घेतला, चंचलेच्या बॅगमधें लपवला न् तिच्यावर आळ घेताहेत. खरं कीं नाहीं धुरंधर ?

**भगवन्त०** : त्यांना काय विचारतेस–मी सांगतों !

**भामिनी** : त्यांना बोलूं द्या की–तुम्ही कशाला मध्यस्थी करतां ?

**भगवन्त०** : मध्यस्थीचा प्रश्नच नाही–खऱ्या सत्याला मध्यस्थीची जरूरीच काय ? मी प्रत्यक्ष पाहिलं चंचला आली तिच्या बॅगमधें कंठा होता–ती पळून जाणार होती. तिला बोलण्याच्या नादांत गुंतवून धुरंधरांनीं कंठा तिच्या बॅगमधून काढून घेतला–त्याबद्दल त्यांचे आभार मानायचे सोडून—

**धुरंधर** : हे असे आभार मानले कीं त्यांनी !

**भामिनी** : तसं कशाला–चंचला आली कीं होईलच सगळा उलगडा.

**भगवन्त०** : पण चंचला येईल तर ना–ती लागली असेल एव्हांना सोलापूरच्या वाटेला.

**भामिनी** : जाऊं दे गेली तर–मी म्हणते, जरी चंचलेनं कंठा घेतला अशी कल्पना केली—

**भगवन्त०** : अजून कल्पनाच का ?

**भामिनी** : घटकाभर तसं जरी धरून चाललं–तरी कंठा मिळाला आहे ना ? आतां हें प्रकरण इथंच मिटवावं.

**भगवन्त** : मी बरं मिटवूं देईन ? हा खासा न्याय आहे. म्हणजे तूं कंठा हवा तिथें ठेवायचा, तुझ्या मैत्रिणीनं तो राजरोस लांबवायचा, सोलापूरला पळून जायचं, चोरी शोधून काढणाऱ्या माझ्या या उपकारकर्त्या मित्राला हें अस बक्षिस मिळायचं न् वर म्हणे हें प्रकरण इथेंच मिटवावं !

**धुरंधर** : भगवन्तराव, माझ्या श्रमाचं झालं एवढं कोडकौतुक पुरे झालं !

**भगवन्त** : असं कुठें झालंय् ? मी आतां पोलिसांत वर्दी देतों, चंचलेला सोलापुराहून आणवतों—

**धुरंधर** : म्हणजे तुम्ही पोलिसांना बोलावणार कीं काय ? संपलं ! माझ्या सगळ्या कर्तबगारीवर पाणी पडलं !

**भगवन्त०** : मग काय तिला मोकळीच सोडूं वाटतं ? निदान तुमच्याप्रमाणं मी तिला या बद्धासनांत पाहीन तेव्हांच माझं समाधान होईल ! मग महाबळांना पुन्हां बोलावून तिची मुलाखत घ्यायला लावतों !

(चंचला व महाबळ येतात)

**महाबळ :** छे, फुरसुंगी एडिशनला कांहीं बातमी जात नाही खास! चंचलाबाई, मला उगीच अडवलंत तुम्ही!

**भामिनी :** चंचला आली–मला वाटलंच येईल म्हणून न् म्हणे पसार झाली यँव झालं न् त्यँव झालं! वाटेल त्याच्यावर संशय घेववतो तरी कसा कुणास ठाऊक.

**महाबळ :** हें पहा, वाटेल त्याच्यावर संशय कसा घेववतो तें बातमीदार झाल्याखेरीज नाही समजायचं! चंचलाबाई, मला कां इथें खेंचून आणलंत? बरं का भगवन्तराव, मी रस्त्यांतून धावतपळत उघडाबोडका ऑफिसच्या रोखानं धूम ठोकीत चाललों होतों—

**धुरंधर :** मग बैल चौखूर उधळला म्हणजे लोक बाजूला सरून वाट मोकळी करतात तसं झालं असेल!

**महाबळ :** पण या चंचलाबाईनी मला मधेंच हटकलं. एकदम ब्रेक लागल्यासारखा थांबलों. आमच्या छापखान्यांतलं मशीन मधेंच एकदम खटकन् बंद पडतं ना–तसं झालं अगदीं!

**चंचला :** मी त्यांना म्हटलं असे पळून कुठें चाललां? त्यांना सांगितलं कीं, माझ्याबरोबर चला म्हणजे मौज दाखवते.

**महाबळ :** शेवटीं नाइलाजानं आलों. मनांत विचार केला–फुरसुंगी एडिशन नाहीं निघाली तर मला काय त्याचं सोयरसुतक? मग चंचलाबाईच्या बरोबर हिंडत यायचं आयतं चालून आलेलं भाग्य कां दवडा? बाकी चंचलाबाई, तुम्ही सबब मोठी छान शोधून काढलीत–म्हणे मौज दाखवते!

**भामिनी** (धुरंधराकडे बोट दाखवीत): ही आहेच कीं मौज!

**महाबळ :** ही आसनशोभा पाहूनच मी बाहेर पडलों होतों.

**चंचला :** थांबा आणखी मौज दिसणार आहे.

**महाबळ :** होय का? मग हरकत नाहीं–चांगला कागद–पेन्सिल सरसावून बसतों!

**भगवन्त० :** चंचलाबाई, तुम्ही परत याल अशी कल्पना नव्हती—

**चंचला :** पण मी गेले होते कुठं? भामिनीला शोधायला म्हणून

बाहेर पडले न् ती सांपडेना म्हणून परत आले–धुरंधर, तुम्हाला सांगून गेले होते कीं नाही ?

**भगवन्त०** : हें पहा, इथें सगळाच गोंधळ माजला आहे. तुम्ही आतां सरळसरळ उत्तरं द्या पाहूं–म्हणजे नीट उलगटा होईल.

**चंचला** : पण यांना कशाला बांधून ठेवलं आहे ?

**भामिनी** : यांनीं कंठा घेतला म्हणून—

**चंचला** : यांनी कंठा घेतला ? (हंसू लागते) यांना आधीं मोकळं करा पाहूं. (सोपाना धुरंधरला मोकळे करतो)

**महाबळ** (घडयाळाकडे पाहात) : एकतीस मिनिटं चार सेकंद–बद्धासनाची कालमर्यादा ! (टिपून घेतो)

**भामिनी** : म्हणजे खरा प्रकार आहे तरी काय ?

**भगवन्त०** : चचलाबाई, मी विचारतों त्या प्रश्नाची उत्तरं द्या म्हणजे झालं.

**चंचला** : ठीक आहे, विचारा.

**भगवन्त०** : मघाशीं तुम्ही बाहेर गेलांत त्या वेळीं तुमच्याजवळ बॅग होती की नाहीं ?

**चंचला** : होती.

**भगवन्त०** : तीत कंठा होता की नाही ?

**चंचला** : होता.

**भामिनी** : तुझ्या बॅगमध्यें कंठा होता न् तें तुला माहीत होतं ?

**चंचला** : हो–तें सांगण्यासाठीच तर मी तुला शोधीत होते.

**भगवन्त०** (भामिनीस) : ऐकलंस ना नीट ? पटली खात्री ?

**महाबळ** (टिपून घेत) : 'कंठ्याची रहस्यमय कहाणी–शंखध्वनीच्या खास चौर्यतज्ज्ञाकडून !' धुरंधर, तुमची मुलाखत आतां थोडीफार लांबणीवर पडली बरं का–हें पहा भगवंतराव, आतां असं सांगा–कंठा केवढा होता, मोती किती होते, कुठून विकत घेतला होता, केव्हां घेतला–सगळ सगळं सांगा—

**भगवन्त०** : थांबा हो जरा. (चंचलेस) या सगळया गोष्टी तुम्हांला कबूल आहेत तर ?

**चंचला :** सगळ्या कबूल—पण यांत एवढं आश्चर्य काय वाटतं तुम्हाला? मीच आपण होऊन जर तुम्हाला हें सगळं सांगणार आहें—मी मौज दाखवणार म्हणते ती काय ?—काय महाबळ ?

**महाबळ :** खरंच चंचलाबाई, ती मौज राहिलीच की ! मला अगोदर असं वाटलं कीं, तुमच्याबरोबर हिंडायचं हीच मौज ! बाकी हिंडत हिंडत आलों, काय मजा आला नाहीं ?

**चंचला :** त्याहून जास्त मौज आहे ही—

**भगवन्त०** (रागानें) : हें पहा—ही मौजमजा राहू द्या बाजूला !

**धुरंधर :** भामिनीबाई, माझ्या निरपराधीपणाची आतां तरी खात्री पटली का ?

**भामिनी :** मला यांतला कशाचाच उलगडा होत नाही.

**भगवन्त० :** कशाला होईल ? तुझं मन तुला खातं आहे—आतां कशाला बोलशील ? चंचलाबाई, हा कंठा तुमच्या बॅगमधें कसा आला ?

**चंचला :** पण माझ्या बॅगमधें कंठा आहे हें तुम्हाला कसं कळलं ? कोणाला माहिती सुद्धां नव्हतं—

**भगवन्त० :** असली लपवाछपवी फार वेळ दडून राहात नाहीं.

**चंचला :** सांगते सगळं—हा घे ग बाई तुझा कंठा (बॅग उघडते. कंठा नाहीसें पाहून आश्चर्यचकित होते) कंठा कुठें गेला ? आत्तां होता ना ?

**धुरंधर** (टेबलावरच्या बॅगेंतून कंठा काढीत) : हाच तो कंठा. काय ?

**चंचला :** होय—पण त्या बॅगमधे कसा गेला ?

**धुरंधर :** तुमच्या बॅगमधून या बॅगमधें कसा आला तें मी मागाहून सांगेन. अगोदर तुमच्या बॅगमधें कसा आला तें सांगा.

**चंचला :** तीच तर खरी मौज. तो कंठा—(थांबते व भगवंतरावाजवळ जाऊन हलकेच सांगते. भगवंतराव धुरंधराला सांगतात, धुरधर महाबळला बांधून ठेवतो.)

**महाबळ :** हें काय ?

**धुरंधर :** आसनाचे धडे देतों तुम्हाला! म्हणजे मुलाखत फारच चांगली रंगवतां येईल तुम्हाला !

**भगवन्त०** : अहाहा ! गोपगोपींच्या टिपऱ्याच्या नाचांतला गोफ सुरू झाला बरं का ! महाबळ, आतां कां स्वस्थ बसलां ? घ्या ना लिहून !

**महाबळ** : चंचलाबाई, मला मौज दाखवायला आणलंत तें—

**चंचला** : मग ही काय लहानसहान मौज चालली आहे ?

**भगवन्त०** : चंचलाबाई, हें नीट उकलून सांगा—

**चंचला** : त्याच असं झालं–आज सकाळीं शंखध्वनि पत्राचे खास जत्राप्रतिनिधि, चौर्यतज्ज्ञ आणि एक अष्टमांश संपादक श्री. महाबळ हे मुद्दाम मला भेटण्याकरतां म्हणून इथें आले—

**भामिनी** : होय का हो ? मला म्हणालांत कटिंग द्यायला आलों !

**महाबळ** : तें राजकारणांतलं कसब आहे ! गांधी व्हाइसरॉयच्या सहा-सहा महिन्यांनीं नुसत्या हवापाण्यासंबंधीं मुलाखती होतात ना त्यांतला प्रकार आहे हा !

**भगवन्त०** : अस्सं–मग कुठच्या फेडरेशनची चर्चा चालली होती चंचलाबाईच्या बरोबर ?

**महाबळ** : ती चर्चा खाजगी स्वरूपाची होती, विशेष कांहीं झालं नाहीं !

**धुरंधर** : थेट हिंदुस्थान सरकारच्या पत्रकांतली भाषा बोलतांहा !

**चंचला** : मी सांगते काय झालं तें—

**महाबळ** : चंचलाबाई, नको, नको–इतक्यांतच नका जाहीर करूं !

**भामिनी** : हें काय ? काय जाहीर करूं नका ?

**महाबळ** : अहो, हें सगळं खाजगी आहे म्हणून सांगितलं ना ! आम्ही एकाद्या पुढाऱ्याला सुद्धां इतके प्रश्न विचारून भंडावून सोडीत नाहीं !

**चंचला** : हे महाबळ आले न् म्हणाले—

**महाबळ** : हो–हो–मी म्हणालों कीं, मला मुलाखत द्या–बस्स–जास्त कांहीं नाहीं ! चंचलाबाई, तुमच्या या बोलण्यांत सगळ्या रोमान्सवर पाणी पडतंय् हो ! !

**भामिनी** : रोमान्स ?

**चंचला** : फार मोठा रोमान्स ! हे आले न् यांनी मला लग्नाची मागणी घातली ! !

**महाबळ :** तें काय एवढं तुम्ही मनावर घेतां ? आमच्या वर्तमान-पत्रांत चुकून भलतेच शब्द पडतात ना तसं चुकून कांहींतरी बोलून गेलों झालं मी !

**भगवन्त० :** तरी म्हटलं महाबळ कालंपासून इथंच मुक्काम ठोकून कां बसले आहेत ? आतां कळलं—लग्नाच्या मागणीसाठीं !

**महाबळ :** चंचलाबाई, आतां पुढलं तरी नका सांगूं—मला फारच लाजल्यासारखं होतंय् ! !

**धुरंधर :** म्हणजे नुसती मागणी करूनच नाहीं थांबले तर ! ऐकू द्या तरी पुढे काय केलं तें !

**भामिनी :** महाबळ, तुम्ही इतके हे असाल अशी नव्हती माझी कल्पना !

**चंचला :** नंतर आपल्या प्रेमाची खूण म्हणून त्यांनी मला एक नजराणा दिला !

**महाबळ :** नजराणा कसला तो ? फूल नाही फुलाची पाकळी म्हणून दिल झालं कांही तरी !

**चंचला :** तो नजराणा म्हणजे हा कठा !

**भगवन्त० :** काय ? हा कठा ?

**धुरंधर :** काय महाबळ ? चचलाबाई काय म्हणताहेत ?

**महाबंळ :** कां ? मी त्यांना कठा दिला—तुमच्या कां पोटांत दुखतं ?

**धुरंधर :** भामिनीबाई, तुमचा चोरीला गेलेला कंठा हाच काय ?

**महाबळ :** नाहीं—नाही; साफ नाही !

**धुरंधर :** गप्प बसा हो—नाही तर या बद्धासनाच्या जोडीला आणखी तोंडांत एक बोळा कोंबून ठेवीन !

**भामिनी :** हाच.

**धुरंधर :** खात्री आहे ?

**भामिनी :** होय.

**महाबळ :** होय काय ? नीट निरखून पहा.

**भामिनी :** माझा कंठा मला ओळखतां येत नाहीं काय ?

**भगवन्त०** (महाबळास) **:** आतां बोला, हा कंठा तुम्ही कसा लांबवलात ? द्या उत्तर झटपट—मी तुमच्यासाठीं टिपून घेतों सगळं !

**भामिनी :** छान छान–तुमचीच मुलाखत सुरू झाली म्हणायची !

**धुरंधर :** बोला–कंठा कुठून आणलात ?

**महाबळ :** विकत आणला.

**भगवन्त० :** विकत आणला ? काय किंमत आहे या कंठ्याची अशी तुमची समजूत आहे–म्हणे विकत आणला !

**धुरंधर :** नशीब समजा–अभिप्रायासाठीं एकानं कंठा धाडला असं नाहीं सांगितलं !

**महाबळ :** एकदां सांगितलं ना–विकत आणला म्हणून ? आज सकाळींच विकत घेतला.

**भगवन्त० :** केवढ्याला ?

**महाबळ :** या कंठ्याची किंमत ठरवूं नका. त्यांत माझ्या भावना दुखावल्या जात आहेत !

**चंचला :** खरच, तुमच्या भावनांची आठवणच नव्हती आम्हांला इतका वेळ !

**महाबळ :** चंचलाबाई, मी प्रेमाच्या ज्या उदात्त भावनेनं ही अल्पशी भेट तुम्हांला दिली तिची–त्या उदात्त भावनेची हे व्यवहारी लोक बाजार–किंमत करीत आहेत हें तुम्हाला पसंत आहे ?

**चंचला :** करीनात ? म्हणजे तुमच्या प्रेमाची किंमत तरी समजेल मला !

**भामिनी** (निरखून पाहात) **:** खास, हा कंठा माझाच. शंकाच नको.

**महाबळ :** पहा बरं पस्तावाल. शब्द मागें घ्या !

**भामिनी :** अगदीं मोतीन् मोती सारखा—

**महाबळ :** भगवन्तराव, तुमच्यासारखे श्रीमंत लोक हे असले कंठे वापरीत असतील अशी माझी कल्पना नव्हती ! असे कंठे तुम्ही वापरणं बरं नाहीं !

**भगवन्त० :** म्हणून तुम्ही उचलून नेत होतां वाटतं ?

**महाबळ :** भामिनीबाई, तुमचा कंठा असाच होतां ना ? अगदीं असा ?

**भामिनी :** कितीदा सांगितलं होय म्हणून ?

**महाबळ :** पुन्हां पुन्हां विचारून ठेवतो—नाहीं तर एकाद्या पुढाऱ्यासारखं मागाहून पत्रक काढून मला बातमीदाराला खोट्यांत पाडाल!

**भामिनी :** हजारदां विचारलंत तरी उत्तर तेंच. माझा कंठा अगदीं अस्सा होता. हाच म्हणना—

**महाबळ :** केवढ्याला घेतला होता ?

**भामिनी :** दीड हजाराला—

**महाबळ :** दीड हजाराला ? अरे बापरे! अहो, त्यानं तुम्हांला चांगलंच फसवलं!

**भगवन्त० :** त्यानं नाहीं फसवलं—तुम्हीच कंठा लांबवून वर्तमान-पत्राच्या कामाचं निमित्त करून पळून जाऊन आम्हाला फसवीत होतां.

**महाबळ :** दुकानदारानें तुम्हांला साफ फसवलं—तुम्ही दीड हजार रुपये मोजलेत—आतां हा कंठा मी केवढ्याला घ्यावा ?

**धुरंधर :** दिडकी खर्च न करतां नेत होतां की! आव तर पहा—म्हणे केवढ्याला घ्यावा!

**महाबळ :**—भगवन्तराव, तुम्ही चवदाशें नव्व्याण्णव रुपये चार आण्यांला साफ बुडालांत! या माझ्या कंठ्याची किंमत बारा आणे आहे बारा आणे!

**धुरंधर :** वेड लागलंय तुम्हाला—काय बोलतां याची शुद्ध आहे कां ?

**महाबळ :** हाताच्या कांकणाला आरसा कशाला ? मला मोकळा सोडा म्हणजे—

**भगवन्त० :** आतां मोकळा सोडण्याची भाषा बंद!

**धुरंधर :** हें बद्धासन इतक्या लवकर संपत नसतं—एकतीस मिनिटं चार सेकंद!

**महाबळ :** बरं राहिलं. निदान माझ्या खिशांतला कागद तरी कोणी बाहेर काढाल का ? (धुरंधर त्याच्या खिशांतून एक कागद काढतो.)

**भगवन्त० :** काय आहे ?

**धुरंधर :** या खोपऱ्यावरच्या 'बुद्रुक स्टोअर्स' मधला कॅशमेमो—

**महाबळ :** नीट पहा—नीट—पहा क्रेडिट मेमो आहे!

**धुरंधर (वाचतो):** कांचेच्या मण्यांचा कंठा नग एक किंमत बारा आणे.

**महाबळ :** पटली खात्री ? कांहो भामिनीबाई, हाच का तुमचा कंठा ?

**भामिनी :** कांचेचे मणी मी हातांत सुद्धां घ्यायची नाहीं !

**चंचला** (महाबळास) **:** तुमच्या प्रेमाची किंमत इतकीच कां हो ?

**महाबळ :** पैशांत काय आहे चंचलाबाई ? कंठा बारा आण्याचा असला तरी माझ्या प्रेमाची किंमत लाखाच्या मोलाची होती !

**चंचला :** मला वाटल तुम्ही खराखुरा कंठा आणून दिलांत.

**महाबळ :** खरा कंठा विकत घ्यायची ऐपत जर या महाबळेश्वराला असती तर तो असा बातम्या खरडीत कां बसला असता !

**भगवन्त० :** हरे राम ! शेवटीं एवढे श्रम करून हा कंठा बुद्रुक स्टोअर्सचाच निघाला ना ! कां हो धुरंधर, तुमच्या अनुमानांच हें अस भलतंच त्रांगड कसं झालं ?

**धुरंधर :** कंठा बारा आण्यांचा कां असेना पण सांपडून दिला कीं नाहीं ? यांतच आमच्या शास्त्राचा विजय आहे !

**भगवन्त० :** पण माझ्या दीड हजार रुपयाच्या कंठ्याचं काय झाल ?

**धुरंधर :** हें पहा, आम्हांला दोन्ही कंठे सारखेच ! तुम्ही तुमची केस आमच्यापुढें मांडलीत—आम्ही कठ्याचा तलास लावून दिला, आतां तो कठा किती किंमतीचा आहे याची चौकशी करण हे आमच्यासारख्या शास्त्रीय चिकित्सकाचं काम नाही !

**भगवन्त० :** पण बारा आण्यांचा कंठा मिळायला तुमच्यासारखे शास्त्रज्ञच कशाला हवे होते ? आमच्या सोपानान सुद्धां दुकानांतून आणला असता—

**धुरंधर :** पण या कंठ्याच्या मागें जो इतिहास आहे, तो कार्यकारणभाव आहे, तो या सोपानाला उकलून दाखवतां आला असतां कां ? बोला.

**महाबळ :** आतां तरी मला मोकळं करतां का ?

**धुरंधर :** एका अटीवर. माझी मुलाखत जन्मांत कधीं मानणार नाही असं वचन द्या आधीं !

**महाबळ :** देतो वचन. ( धुरंधर त्याला मोकळे करतो.)

**धुरंधर :** म्हणजे पुन्हां नवीन शास्त्रीय बैठकीपासून सुरुवात करायला हवी !

**भगवन्त०** : तुम्ही जन्मभर बैठकीच मारीत बसा! कंठ्याचा पत्ताच नाही!

**महाबळ** : भगवंतराव, आतां तरी सांगाल का सगळी माहिती? कंठा केवढा होता, केव्हां विकत घेतला, मोती किती होते—"हरवलेला कंठा" असा मथळा टाकून माझ्या या बुद्रुक स्टोअर्सच्या कंठ्याचाच फोटो देणार आहें मी!

**भगवन्त०** : मी इकडे आहे चोरीच्या फिकिरीत न् यांना मुलाखती सुचताहेत! ( भामिनीस ) या सगळ्याला कारण तूं!

**भामिनी** : हो, दुसर कुणी सांपडलं नाही म्हणजे मी बरी आहे वाईट-पणा घ्यायला! चचले, पाहिलंस ना? कसा स्वभाव आहे तो? म्हणत नव्हते मी?

**भगवन्त०** : माझी निंदा करण्यावांचून तर तुला दुसरा उद्योगच नाही!

**धुरंधर** : हे पहा भगवन्तराव, भामिनीबाई, चंचलाबाई, अहो महा-बळ, तुम्ही सर्वजण मला मदत कराल तर माझ्या शास्त्रीय अभ्यासाच्या जोरावर अजूनहि यशाचं शिखर आपल्याला गाठतां येईल असा मला विश्वास आहे!

**महाबळ** (टिपून घेत) : तीन उद्‌गार चिन्हं आणि कंसांत टाळ्यांचा कडकडाट!

**धुरंधर** : चोर आपल्यापैकी कुणीच नाही—तो बाहेरचा आहे ही एक गोष्ट आतां सिद्ध झाली आहे, हा कांही लहानसहान फायदा नाही!

**भामिनी** : वा, वा! फारच मोठा फायदा! चचले, चल—यांची हीं नफातोट्याची तर्कटं कांही संपायचीं नाहीत!

**चंचला** : भामिनी उगीच डोक्याला त्रास करून घेऊ नकोस—तूहि चल—काय ग, इथें महादजी शिंद्याचा बस्ट होता तो काय झाला?

( भगवन्तराव व धुरंधर एकमेकांकडे पाहतात! )

**भगवन्त०** : इथें कधी बस्ट होता?

**चंचला** : नव्हता कसा? मी चांगला पाहिला! नाही का हो धुरंधर?

**धुरंधर** : महादजी शिंद्याचा बस्ट? न् या खोलींत? आठवत नाहीं बुवा!

**महाबळ :** म्हणजे पुन्हां चोरी !

**चंचला :** अहो तुम्ही चांगल म्हणालांत कीं भामिनीनं आणला म्हणून !

**भामिनी :** इश्श– काही तरीच–मी कधी आणला ?

**चंचला :** धुरंधर म्हणत होते—

**धुरंधर :** छे हो, तुम्हांला कांहीं तरी भास होतो आहे. मी कशाला म्हणतों आहे असलं कांहीं ? भगवन्तराव, तुम्ही पाहिलात इथं बस्ट ?

**भगवन्त० :** छे बुवा–मुळीच नाहीं !

**सोपाना (प्रवेश करीत) :** बाईसाब ही ग्यासची बत्ती कुठं ठेवूं ?

**भामिनी :** ठेव मसणांत ! आचरट मेला–भलत्या वेळी भलतं विचारायला येतो !

**महाबळ :** छे, छे–मला गेलंच पाहिजे. या कंठयाच्या चोरीच्या बातमीसाठीं जादा अंक काढायला सांगितला पाहिजे ! (जातो.)

**भगवन्त० :** धुरधर, अजून वाटतं पोलिसांत—

**धुरंधर :** छे, छे, तुम्ही निर्धास्त रहा–अठ्ठेचाळीस तासांच्या आंत कंठा सांपडून देतों, मग तर झालं ? आतां मी या प्रकरणाचा अगदीं वेगळ्या दिशेनें विचार करूं लागलों आहे–नव्या कल्पना, नवीं अनुमानं माझ्या डोक्यांत थैमान घालूं लागलीं आहेत ! (नकाशांत पाहून) ‘ ड–क ’ रस्ता–‘ ई ’ कंठा–‘ क ’ दरवाजा—हां, असच ! !

(भगवन्तराव त्याच्याकडे विषण्णपणें पहात बसतात. पडदा पडतो.)

# ३

[ **स्थळ** : पहिल्या अंकातलें; दिवस तोच. संध्याकाळीं ५।। चा सुमार. भगवन्तराव कपाळावर हात देऊन सचिन्त मुद्रेनें कोचावर बसले आहेत. भामिनी स्वयंपाकघरांतून येते व पुस्तकांच्या कपाटांतील पुस्तक शोधूं लागते. भगवन्तराव तिच्या हालचालीकडे पाहतात तें थोड्या वेळानें भामिनीच्या लक्षांत येतें. ]

**भामिनी** : असें काय टक लावून पाहतां माझ्याकडे ? (भगवन्तराव कांहींच बोलत नाहींत. भामिनी एका कपाटाकडून दुसऱ्या कपाटाकडे वळते, भगवन्तराव ती जाईल त्या त्या दिशेकडे आपली सचिंत नजर फिरवितात.)

**भामिनी** : हें काय आज नवीनच काढलं आहे ? असें नका निरखून पाहूं !

**भगवन्त०** : कां ? तुला माझी दृष्ट लागेल म्हणून होय ? बरं आहे; मी आपला आढ्याकडेच पाहत बसतों ! आतां तर कांही तुझी तक्रार नाहीं ?

**भामिनी** : झाली वांकडं तिकडं बोलायला सुरुवात.

**भगवन्त०** : खरं आहे. तुझ्यासारखं सरळ बोलतां नाहीं येत आम्हांला, काय करायचं ?

**भामिनी** : हा असा अडून छळ कां करतां माझा ? त्यापेक्षां सरळ सरळ काय बोलून घ्यायचं आहे तें घ्या ना !

**भगवन्त०** : म्हणजे मी तुझा छळ करतों आहे—

**भामिनी** : नाहीं तर काय ?–माणसाच्या सोशिकपणाला सुद्धां सीमा असते.

**भगवन्त०** : होय–म्हणून तर इतका वेळ मी शांत राहिलों आहे !

**भामिनी** : शांत ?–बरे असाल शांत–आंत भडका झाला असेल. बायकोला खाऊं कीं गिळूं असं झालं असेल. म्हणून तर अशा मारक्या नजरेनं पाहात होतां माझ्याकडे.

**भगवन्त०** : छे–छे–मी तुझ्याकडे रागीट नजरेनें कसा पाहीन ?–मी कौतुकानं पाहात होतों !

**भामिनी** : बस करा हा मानभावीपणा.

**भगवन्त०** : कौतुकानं अशासाठी कीं, सकाळी तू अशीच पुस्तकं शोधीत होतीस तेव्हां मला ती 'ड' आकृति काढून दाखविलीस. आतां या खेपेला तुझ्या कल्पक डोक्यांतून काय काय नवीन सबबी निघणार आहेत याचा विचार करीत मी तुझ्याकडे कौतुकानं पाहात होतों !

**भामिनी** : हें तुमचं सरळ बोलणं ? माझ्या अंगाला भोकं पडेपर्यंत तुमची हीं छद्मीं बोलणी नाही सपायची. मुद्दाम एकाद्याचा छळवाद करण्यांतच जिथें गंमत वाटते– (अर्धवट स्फुंदत) एकाद्या मोलकरणी-इतकी सुद्धां घरांत माझी किंमत नाही.

**भगवन्त०** : आतां हें तुझं तरी सरळ बोलणं झालं का ? एवढा दीड हजाराचा कंठा तू हरवलास, पण एका अक्षरांत तरी मी बोललोंय ?

**भामिनी** (उपरोधिकपणे) : छे, छे, सकाळपासून तर तुम्ही इतके गप्प आहांत की एकाद्याला वाटाव, आज तुमचा मौन दिवसच आहे !

**भगवन्त०** : कधीं सरळ उत्तर मिळेल तर शपथ ! बायकोनंच नवऱ्याची इतकी किंमत ठेवली तर इतर लोक काय ठेवतील तें दिसतंच आहे !

**भामिनी** : हो–आरडून ओरडून बोललं न् थोडा कांगावा केला म्हणजे झालं. मी म्हणतेच ना कीं बोलणं ऐकलं तर एकाद्याला वाटावं–हे फार सज्जन आहेत, पण बायकोच खाष्ट आहे बरं का !

**भगवन्त०** : एकाद्यालाच का–सगळ्या गांवाला तसं वाटतंय् !

**भामिनी :** ऐकायला शब्द किती साधे–पण असे खोंचून, टोंचून बोलतील कीं, जन्मभर बायकोला आठवण राहील !

**भगवन्त० :** वा: हा भलताच आरोप—

**भामिनी :** मग काय खोटं आहे त्यांत ? घरांतल्या एका गोष्टीवर तरी माझी सत्ता आहे का ?—का सुख आहे ?

**भगवन्त०** (कोष्टकें, नकाशे, फळांची चित्रे वगैरे दाखवीत) : मग ही सगळी छांदिष्टपणाची टांगती जाहिरात कुणाच्या सत्तेची ? —माझ्या ? माझी आवड म्हणून मी हा सगळा बाजार मांडला आहे ? माझ्या सुखासाठीं ?

**भामिनी :** माझ्या आवडीनिवडीप्रमाणें मी हॉल सजवला–पण माझी काय सत्ता आहे त्यावर ? तुम्ही पांच पांच मिनिटांनीं माझी टवाळी करायला टपलेले–काय सुख लागणार मला या सजवण्यांत ? एक बिचारी मैत्रीण आली कधीं नवत राहायला–ती सुद्धां तुमच्या डोळ्यांत खुपते. ती बिचारी गरीब म्हणून गप्प बसली. दुसरी एकादी असती तर–चोरीचा आळ घेतल्यावर घोटभर पाणी प्यायला सुद्धां या घरांत राहिली नसती.

**भगवन्त० :** अन् माझ्या मित्राची तरी तू काय कमी शोभा केलीस ? मी बाहेर गेलों असें पाहून तेवढ्यांत दोरखंडानं बिचाऱ्याला जखडून टाकलंस–काय किंमत केली असेल त्यानं आमची ? बायकोला फार शेफारून ठेवली आहे अस म्हटलं तर त्यांत काय चुकलं ?

**भामिनी :** तुमच्या त्या धुरंधरांच्या हातांत मी प्रत्यक्ष माझ्या डोळ्यांनीं कंठा पाहिला म्हणून केलं तसं. पण चंचलेवर आळ घेतांना तुमच्याजवळ काय पुरावा होता हो ? तुम्ही स्वतः तिच्याजवळ कंठा पाहिलात का ?

**भगवन्त० :** हो–हो–मी स्वतः पाहिला.

**भामिनी :** तुम्ही स्वतः पाहिलात ? चंचलेच्या बॅगमधून काढून घेतला असं त्या धुरंधरांनीं कांहीं तरी बनवून सांगितलं न् तुम्ही तें ऐकलं झालं !

**भगवन्त :** नाहीं–नाहीं–बनवून नाही सांगितलं.

**भामिनी :** तुमच्यादेखत धुरंधरांनीं तिच्यापासून कंठा काढून घेतला का ? सांगा; तुम्ही तिथं होतां त्या वेळीं ?

**भगवन्त० :** मी ना ?–होय, होतों तर—

**भामिनी :** थांबा, मी चंचलेलाच बोलावते—

**भगवन्त० :** नको, नको, मी हजर होतों म्हणजे प्रत्यक्ष हजर नसलों तरी अप्रत्यक्षपणें हजर होतों! म्हणजे–असं की–मी जवळपासच कुठें तरी होतों, मला वाटतं !

**भामिनी :** बरं किती झालं तरी माझी मैत्रीण होती ती. तिनं कांहींहि केलं असल तरी तिला एकदम बोलण्यापूर्वी तुम्ही जरा विचार करायला हवा होता. पण बायकोचीच किंमत जिथ कवडीशून्य तिथं—

**भगवन्त० :** हें बघ, उगीच इथें माझ्यावर तणतणत बसूं नकोस–जा पाहू इथून. मला जरा स्वस्थ एकट बसू दे.

**भामिनी :** माझंच चुकलं. मी जर तुम्हांला डोळ्यांसमोर सुद्धां नको आहे तर–(जाऊं लागते. वाटेत दोराला पाय अडखळतो. ती रागावून सोपानाला हांक मारते.) सोपाना, आज तुझं डोकंबिकं फिरलं आहे की काय ? हा दोर मघांपासून इथंच पडला आहे. कुणी उचलायचा तो ? मी ?

**सोपाना (ओशाळून) :** पण कुठं ठेवायचा तो ? सैंपाकघरांत—

**भामिनी :** ठेव चुलीत ! (भगवन्तरावांकडे रागीट नजरेनें पाहात) काय एकेक माणसं मिळाली आहेत पण !

**भगवन्त० :** अन्–काय रे सोपाना, तुझी मिजास फार वाढत चालली आहे अलीकडे ! आत्तां मी पाहिलं–माझं धोतर न् शर्ट बादलींत तसाच कुजत पडला आहे. तो कुणी धुवायचा ? मी ?

**सोपाना :** नाय धनीसाब–पन्—

**भगवन्त० :** पण काय ? वर तोंड करून बोलतोस आणखी ?

**सोपाना :** नाय धनीसाब, पन् त्यें लाटणं नाहीं ना अजून मिळत !

**भगवन्त० :** शुद्धींत आहेस का ? धुणं धुतलंस का असं विचारलं मी–पोळ्या लाटल्यास का तें नाहीं विचारलं !

**सोपाना :** हा–पन्–धुवायचं एक लाटणं–आज दुपारीं बाईसाब—

**भगवन्त० :** जास्त बडबड करूं नकोस. नाही तर तें लाटणंच घालीन टाळक्यांत ! (भामिनीबाईकडे रागानें पाहात) गप्प बसून पाहतों आहे तर एकेक छांदिष्टपणा वाढायलाच लागला आहे !

**भामिनी :** उभा काय राहिला आहेस घुसळखांब्यासारखा ?

(भामिनी तावातावानें खोलीत जाते. भगवन्तराव हातपाय आपटीत जिन्याने वर जातात. सोपाना दोर गुंडाळूं लागतो. भामिनी थोड्या वेळानें घाईघाईनें बाहेर जाते. नंतर भगवन्तराव जोडा फटक् फटक् वाजवीत बाहेर जातात. दोघेही बाहेर गेल्याचें पाहतांच सोपाना काम तसेंच टाकून स्वस्थ बसतो. कांहीं वेळानें महाबळ घाईघाईनें आंत येतो.)

**महाबळ :** काय सोपानराव–पुन्हां आम्हांला दोरानं बांधून ठेवणार कीं काय ? चुकलों हं मी–तुम्हांला विचारल्याशिवाय आंत आलों—(जाऊं लागतो. )

**सोपाना :** हमाबळ, या या–आलां काय–चाललां–काय ?

**महाबळ :** तुझ्याशी जरा बेतानंच वागलेलं बरं. शिस्तीचा कडवा भोक्ता दिसतो आहेस तू ! मी चुकून सकाळी थोडा शिस्तभंग केला तर कॉंग्रेसहून सुद्धां जास्त भयकर प्रायश्चित्त तूं मला दिलंस ! सकाळीं एकदम हमरीतुमरीवर आलास–दुपारीं मला करकचून बांधून ठेवलंस–आतां संध्याकाळी माझं काय करशील याचा कांही नेम नाही. तेव्हां—

**सोपाना :** महाबळ, तुम्ही आतां कवा बी या–रात्री या–पहांटं या–या सोपानाच्या तोंडून अक्षर निघायचं नाही.

**महाबळ :** शाबास, माझी 'पोझिशन' शेवटी तू ओळखलीस ! मराठी वर्तमानपत्राच्या बाबतीत तूं एवढं सहानुभूतीच धोरण स्वीकारलस याबद्दल मी 'शखध्वनी' तर्फे तुझे आभार मानतों ! पण तू तुझं धोरण एकदम कसं बदललस रे? आम्ही वर्तमानपत्राचीं माणस धोरणाच्या धरसोडीबद्दल एवढी प्रसिद्ध–पण त्यांना सुद्धां तू आज लाजवलंस !

**सोपाना :** त्याच असं आहे–घराला घरपणा राहिला नाही—

**महाबळ :** म्हणजे ?

**सोपाना :** आज सकाळपून घरांतलं सगळं उलट्याच्या पालटं झालंया. धनीसाब न् बाईसाब असं कडाडून बोलत्यात न् दोघांचा राग निघतो माझ्यावर ! त्यांचा होतो खटका न् भांडखोर ठरतो सोपाना ! कां? तर तो आपलं काम इमानानं करतो म्हून !

**महाबळ :** असंच आहे बाबा जग–आपल्यासारख्या गरीब न् सच्च्या

लोकांच्यासाठीं दुनिया नाहीं बरं ! हें बघ सोपाना–त्या चंचलाबाई आहेत ना अजून इथेंच ? का गेल्या सोलापूरला ?

**सोपाना :** त्ये मला काय इच्चारूं नका. सकाळपून तुमचं जें जे काय चालंलया त्यांत माझं डोक्सं तर अक्षी उठून गेलंया ! मला त्याच्याबद्दल काय बी इच्च्यारूं नका.

**महाबळ :** बरं–पण कंठा सांपडला का नाहीं हें तर सांगशील ?

**सोपाना :** त्ये मला काय ठावा नाय–दुपारचा–गोंधळ—

**महाबळ :** तो गोंधळ जाऊं दे रे–त्याच्यानंतर नाही ना कठा सांपडला?

**सोपाना :** मला उगाच तरास नका देऊ–एकदां नाय सांगितल कीं नाय. पुन्हां पुन्हां काय हुजत घालताया—

**महाबळ :** अरे ही हुजत नाही-मी तुझी मुलाखत घेतों आहे ! फार महत्त्वाची मुलाखत आहे. साग सांग–चंचलाबाई कुठें आहेत–माझं त्यांच्याशीं फार महत्त्वाचं काम आहे. (चचला येते) वा:, चचलाबाई, अगदीं शंभर वर्षे आयुष्य आहे तुम्हांला–आतांच तुमच्याबद्दल चौकशी करीत होतों. (सोपाना दोरखंड घेऊन त्रासिक मुद्रेनें जातो.) कंठा सांपडला का ?

**चंचला :** कोणता कंठा ? तुम्ही जो नजराणा म्हणून दिलात तो बुद्रुक स्टोअर्समधला कंठा का ? तो तुम्हांला परत पाहिजे ? अस्सं–दुसऱ्या एकाद्या मुलीचा चेहेरा–कसला तरी रिपोर्ट लिहितां लिहितां ध्यानांत ठेवलेला दिसतोय! तिला देण्यासाठीं—

**महाबळ :** चंचलाबाई, ही थट्टेची वेळ नाहीं !

**चंचला :** तुम्हांला कोणी सांगितल मी थट्टा करते आहें म्हणून ? अन् काय हो, माझ्याशीं तुम्हांला लग्न करायचं आहे ना ? मग मी थोडीशी केली थट्टा म्हणून तरी काय झालं ?

**महाबळ :** थट्टा करण्यासाठीं म्हणून मी मागाहून स्वस्थपणानं येईन हवा तर! आतां आहें मी ड्यूटीवर. 'शंखध्वनी'चा खास अक निघायचा आहे आत्तां या कंठ्याच्या चोरीच्या बातमीसाठीं. म्हणून मी चौकशी करायला आलों आहें. सांगा ना–कंठा सांपडला का ?

**चंचला :** तुम्हांला माझ्याशीं पांच मिनिटें बोलायला सुद्धां फुरसत नाहीं; मग लग्न झाल्यावर काय कराल ? बायकोला रस्त्यांत एकटी सोडून

तुम्ही एकादी बातमी मिळविण्यासाठी मधेंच कुठें तरी सटकायचे! तुमच्याशीं लग्न करण्यापूर्वी तुमच्या भावी वधूला पुष्कळच विचार करायला हवा !,

**महाबळ :** चचलाबाई, तुमच हें असलं बोलणं ऐकून अशा गुदगुल्या होताहेत म्हणतां! वाटत, आत्तांच्या आत्तां शंखध्वनींतल्या नोकरीचा राजीनामा खरडावा न् तुमचं हें असलं बोलणं जन्मभर ऐकत बसावं !

**चंचला :** छान! शखध्वनींत नोकरी आहे म्हणून निदान हा खोटा कठा तरी आणून दिलात–नोकरी सोडल्यावर काय देणार ? पोतेचे मणी ?

**महाबळ** (सुस्कारा सोडीत) : हं ! तेंहि खरंच आहे ! कर्तव्याची कठोर जाणीव जागती ठेवून स्वतःच्या सुखावर पाणी सोडायची मनाची तयारी केलीच पाहिजे. करतां काय ? मला गेलच पाहिजे. खास अक माझ्यासाठी खोळबून राहिला असेल–मग सांगा ना ? मी काय समजू ?

**चंचला :** सांगितलं ना सकाळीं ? तुमच्यासाठी पुरेशी सहानुभूति वेगळी काढून ठेवली आहे म्हणून !

**महाबळ :** च्–च्–अहो, हा प्रश्न माझा खाजगी नाही, मुलाखतीपैकीं आहे! मला चोरीबद्दल माहिती हवी आहे.

**चंचला :** पाहिलंत ? हा अस्सा घोटाळा होतो. तुमचा खाजगी प्रश्न कोणता आणि मुलाखतींतला कोणता हें कांही अजून ध्यानांत येत नाही ! म्हणजे सकाळच्यासारखं माझ्याशीं ‘ सर्वस्वी खाजगी स्वरूपाचं ’ असं कांही बोलायची तुमची इच्छा नाहीं तर ?

**महाबळ :** तस नाही, गैरसमज होतोय तुमचा. काय करावं ? तिकडे जादा अंक खोळंबून बसला असेल न् इकडे जीव तर सगळा तुमच्या जवळ गुंतून राहिला आहे !

**चंचला :** म्हणजे ‘ ऑफिशिअल ’ जीव शखध्वनीकडे न् खाजगी जीव माझ्याकडे–असच ना ? बारा आण्यांचा कठा देतांना खाजगी जीव—

**महाबळ :** चचलाबाई, कां, माझा अंत पाहतां आहां ?

**चंचला :** महाबळ, तुम्ही वर्तमानपत्राच्या धंद्यांत शिरलांत खरे पण फुकट !

**महाबळ :** म्हणजे ?

**चंचला :** माझ्यासारख्या एका यःकश्चित् तरुणीकडून बोलतां बोलतां

बातमी काढून घेतां येत नाही तुम्हांला—मग एकाद्या पुढाऱ्याशी गांठ पडली तर, काय कराल ?

**महाबळ :** हं ! पुढाऱ्याला नाहीं आम्हीं डरत !

**चंचला :** मग ? मला घाबरतां वाटत ?

**महाबळ :** तसं नाही. पण तुमची गोष्ट पुढाऱ्यांहून वेगळी आहे पुढाऱ्यांचं न् आमचं काय घेणंदेणं आहे? त्यांचा एकपट ताठा तर त्याच्या सवाई आमचा लोचटपणा ! धरणंच धरून बसलं म्हणजे मग कटाळून का होईना आम्हांला बातमी पुरविल्याखेरीज गत्यंतरच नसतं त्यांना. बरं, आम्हीहि म्हणतों पुढारी रागावला तर रागावला—फार तर दोन व्याख्यानं जास्त झोडील ! आम्हांला काय त्याचं ? पण तुमच्या बाबतीत तसं नाही. तुमच्याबद्दलच्या माझ्या भावना—

**चंचला :** हो—खरंच—तुमच्या भावना नाहीं कां ? सकाळपासून तुम्ही भावना, भावना असा सारखा जप करतां आहां तरी काय करावं—मला तुमच्या भावनांची आठवणच कशी ती राहात नाही ! आतां आठवलं— कठा बारा आण्यांचा पण भावना मात्र लाख मोलाची ! असंच ना ?

**महाबळ** (घाईनें) **:** तुमच्याशी बोलण्यांत असा वेळ घालवून भागायचं नाहीं. निघालंच पाहिजे मला. चोरीबद्दल देतों झालं कांहीं तरी दडपून ! खास अंक घेऊन पुन्हां येईनच मी.

**चंचला :** कशाला ?

**महाबळ :** कशाला म्हणजे ? सहज ! तरुणतरुणींना एकमेकांना भेटायला कारणाची जरूरीच लागत नाही कधीं ! एवढा खास अंक बाहेर पडला की येतोंच मी. मग स्वस्थपणानं बसू बोलत. मी येईपर्यंत माझ्या सकाळच्या अर्जाचा विचार करून ठेवा तुम्ही. (जाऊं लागतो.)

**चंचला :** तुमच्या अर्जाचं उत्तर मी ठरवून सुद्धां ठेवलं आहे.

**महाबळ :** अर्जाचं उत्तर ठरलं आहे ?—देवा, माझ्या कानावर आतां काय पडणार आहे ?

**चंचला :** तुम्ही माझ्यासाठीं वाटेल तो स्वार्थत्याग करायला तयार आहांत ना ?

**महाबळ** ( लाजत ) **:** हंः—हें काय ? मी सांगायलाच पाहिजे का ?

**चंचला :** पहा बरं–

**महाबळ :** तसं कशाला ? वेळ आली म्हणजे प्रत्यक्षच पहा म्हणजे झाल.

**चंचला :** आतांच वेळ आली आहे म्हणून विचारते.

**महाबळ :** स्वार्थत्यागाची वेळ आली आहे ? ठीक आहे. बोला कोणता स्वार्थत्याग करूं ? नोकरीवर लाथ मारून इथेंच जन्मभर तुमच्याशी बोलत बसू ? का—

**चंचला :** नको, नको. इतका भयकर स्वार्थत्याग नका करूं !

**महाबळ :** मग काय करूं ?बोला, झटकन् बोला.

**चंचला :** यापुढें दोन वर्षं मला एकदां सुद्धां भेटायचं नाही.

**महाबळ :** वा चचलाबाई, ही काय भलतीच अट ?

**चंचला :** हीच का तुमची स्वार्थत्यागाची तयारी ? दोन वर्षं तुम्ही मला मुळींच भेटायचं नाही. मी मात्र तुमच्या कर्तृत्वाकडे, पराक्रमाकडे डोळे लावून बसते—

**महाबळ :** बोला, पुढल्या दोन वर्षात कोणता पराक्रम करून दाखवूं बोला ! संपादकाशी भांडून त्याच्याजवळ माझा तीन महिने थकलेला पगार मागू की 'शखध्वनी'च्या नाकावर टिचून एकादं स्वतंत्र वर्तमानपत्र काढू ? खुनाच्या म्हणाल तितक्या बातम्या मिळवतों–सांगाल त्या माण-साची म्हणाल तितक्या वेळां मुलाखत घेतों–पुढल्या दोन वर्षांत तुम्हांला रोज तीन या हिशेबानं पत्र पाठवतों–बोला, बोला यांपैकीं कोणता पराक्रम करून दाखवूं ? बोला !

**चंचला:** हें पहा–मी कांही सीता–द्रौपदीसारखा पण नाही लावला. तुमच्या कर्तृत्वाला सगळं जग मोकळ आहे. मला एकदां सुद्धां भेटायचं नाहीं ही अट मात्र विसरायची नाहीं–पत्र सुद्धां पाठवायचं नाहीं.

**महाबळ :** ठीक आहे. भेट न् पत्र नाही तर नाहीं. तुमची आठवण झाली म्हणजे शंखध्वनीच्या अंकांत तुमचा फोटोच छापत जाईन म्हणजे झालं ! पण हा स्वार्थत्याग न् पराक्रम उद्यांपासून सुरू करायचा ना ?

**चंचला:** होय.

**महाबळ :** म्हणजे आजचा दिवस तरी आपल्याला गप्पागोष्टी करायला हरवत नाहीं ! न् हो—हें एक भामिनीबाईच्यासाठीं कटिंग आणलं होतं.

**चंचला :** म्हणजे रोज आणतां तरी किती हीं कटिंग्ज ? द्या तें माझ्याजवळ—मी देईन तिला. (कटिंग घेते.)

**महाबळ :** जाऊं नका हं कुठें बाहेर—आलोंच मी—(घाईनें जातो. चचला कोचावर बसून तें कटिंग उलट सुलट करून वाचते. मधेच कांहीतरी कल्पना सुचून ती कपाट उघडून पाहते व भिंतीकडे न्याहाळून पाहू लागते. धुरंधर, हातांतल्या बारक्या हातोडीनें भिंतीवर ठोके मारीत मारीत दबत दबत प्रवेश करतो.)

**चंचला :** काय शास्त्रीबुवा—काय चाललं आहे ?

**धुरंधर :** तुम्ही आहांत का इथं ? मला वाटलं मी एकटाच आहें.

**चंचला :** पण चाललंय् काय ?

**धुरंधर :** नव्या मोहिमेवर आहें मी !

**चंचला :** नवी मोहीम ? अस्सं—म्हणजे कठा शोधण्यासाठीच का हें सगळं चालल होतं ?

**धुरंधर :** होय—या प्रश्नाचा सगळ्या दृष्टींनी विचार करायचा—संशयाला जागा म्हणून ठेवायची नाही—

**चंचला :** म्हणून भिंती ठोकत बसलां आहां वाटतं ?

**धुरंधर :** त्याचा काय नेम ? भिंतींत चोरदरवाजे, भुयारं—काय वाटेल तें असण्याचा संभव आहे. म्हणून भिंतींत कोठें पोकळी आहे का पाहात होतों !

**चंचला :** अस्सं होय—मला वाटलं की, हातोड्यानं भिंतीचा गिलावा काढतां आहीं ! म्हटलं धुरंधर गवंडी केव्हांपासून झाले ?

**धुरंधर :** आम्हां चौर्यशास्त्रज्ञांना कोणत्या वेळीं काय बनावं लागेल त्याचा नेम नाहीं. चंचलाबाई, मला या कामांत तुमची मदत हवी आहे.

**चंचला :** मग द्या माझ्या हातांत दुसरी एकादी हातोडी; बसते भिंतीवर घाव घालीत !

**धुरंधर :** तसं नाही हो—अठ्ठेचाळीस तासांच्या आंत कंठा सांपडून देतों अशी मी भगवन्तरावांजवळ प्रतिज्ञा केली आहे. त्यासाठीं मला माझं

सगळं शास्त्र, अनुभव इरेस घातला पाहिजे. मी तुमची जबानी घेणार आहें. माझ्या प्रश्नांचीं उत्तरें द्या म्हणजे माझ्या तपासाला बरीच मदत होणार आहे (वही काढतो.) चंचलाबाई, बोला आपलं नांव ?

**चंचला :** छे, छे, तुम्हांला हें चौर्यशास्त्र नीटसं येत नाही अजून. चोरीला गेला कंठा न् माझ्या नांवापासून सुरुवात करतां ?

**धुरंधर :** रागावूं नका. त्याचं असं आहे—आमच्या शास्त्रांतल्या नियमा-प्रमाणं चाललोंय् मी. मग काय बिशाद आहे कंठा सांपडत नाहीं ? म्हणून तुमचं नांव जरी मला आधींच माहीत असलं तरी शास्त्राच्या नियमांचं उल्लंघन होऊं नये म्हणून पुन्हां विचारलं ! रागावूं नका हं.

**चंचला :** रागावले नाहीं मी—पण आश्चर्य मात्र वाटल. तुम्ही स्वतःला एवढे तर्कतीर्थ म्हणवतां—पण अजून या शास्त्रांतलं तुमचं ज्ञान फारच अपुरं आहे !

**धुरंधर :** चंचलाबाई, हे तुम्हीच बोलतां आहां म्हणून मुकाट्यानं ऐकून घेतों आहें मी. दुसरा एकादा असता तर—तुम्हांला काय समजतं हो या शास्त्रांत ?

**चंचला :** तुमच्याहून जास्त समजतं इतकं खास. अहो, एवढी मोठी चोरी झालेली—त्याला पुरावा सुद्धां भरपूर मिळवला पाहिजे.

**धुरंधर :** पुन्हां बजावतों. माझ्या शास्त्रीय ज्ञानात चूक काढलेली मला नाहीं खपायची. मी काय कमी पुरावा मिळवला आहे ?

**चंचला :** काय पुरावा मिळवलात ? आधी माझं नांव विचारायचं हीच तुमची पुराव्याची कल्पना.

**धुरंधर :** पुरावा मिळविण्याची तुमची काय कल्पना आहे ती तरी ऐकू द्या एकदां.

**चंचला :** थांबा हं—प्रत्यक्षच दाखवतें. ती तुमची वही न् पेन्सिल आणा इकडे. आतां तुमचीच जबानी घेऊं हं आपण !

**धुरंधर :** माझी जबानी आणि तुम्ही घेणार ?

**चंचला :** काय हरकत आहे ? तुम्ही चौर्यशास्त्रांतले बडे तज्ज्ञ अहां—कबूल; पण चोरी झाली तेव्हां याच घरांत होतां ना ? तुम्हीच ही चोरी

केली नसेल कशावरून ? तुमच्या शास्त्राचं पहिलं तत्त्व हेंच ना कीं, चोरीचा संशय प्रत्येक माणसावर—

**धुरंधर** (आश्चर्यानें) : होय–पण हीं आमच्या शास्त्राचीं तत्त्वं तुम्हांला काय माहीत ?

**चंचला** : हं–बोलूं नका–मी विचारलेल्या प्रश्नांचीं निमूटपणं उत्तरं द्यायचीं—

**धुरंधर** : वा: हा इशारा सुद्धां अगदीं शास्त्रीय पद्धतीनं बरोबर दिलात ! चांगलीच प्रगति आहे तुमची या शास्त्रांत !

**चंचला** : हं, बोला–आपल्या पणजोबाचं नांव ?

**धुरंधर** : पणजोबा ? इथं कुणाच्या बापाला आठवतो आहे ! काय हो, आम्ही नाहीं कधीं पणजोबाचं नांव विचारीत !

**चंचला** : मग म्हणते काय–तुम्ही अजून या शास्त्रांत कच्चे आहांत ! हं बोला लवकर–आपल्या पणजोबाचं नांव ?

**धुरंधर** (मटकन् खुर्चीवर बसत) : भोलानाथ !

**चंचला** (हंसू दाबीत) : तुमच्या पणजोबांचं मूळ गांव कोणतं ?

**धुरंधर** (गांगरून): मूळ गांव–मूळगांव—

**चंचला** (टिपून घेत) : मूळचं गांव–मूळगांव.

**धुरंधर** : मूळगांव नाहीं–छे, छे–चंचलाबाई, तुमचं हें शास्त्र फारच गहन दिसतंय् बुवा !

**चंचला** : तुम्हांला या साध्या प्रश्नांचीं उत्तरं देतां येत नाहींत धड–मग कसला पुरावा गोळा करणार? म्हणे अठ्ठेचाळीस तासांच्या आंत कंठ्याचा तलास लावून देतों. तुम्हांला तर अजून चौर्यशास्त्राचा श्रीगणेशा सुद्धां येत नाहीं ! अठ्ठेचाळीस वर्षं शोधीत बसलांत तरी नाहीं सांपडायचा कंठा.

**धुरंधर** : हें पहा–तुम्हांला शास्त्र पुष्कळ कळत असलं तरी आम्हांला सुद्धां थोडेंफार येतंय. तुम्ही तरी सांगतां का–अमुक तासांत कंठा सांपडून देतों म्हणून ?

**चंचला** : तसं कशाला ?–तुमचं म्हणणं तुम्ही कंठा शोधून काढणार असंच ना ?

धुरंधर : हो–हो–पुन्हां सांगतों–अठ्ठेचाळीस तासांच्या आंत.

चंचला : अन् नाहीं सांपडला तर ?

धुरंधर : तुम्ही सांगाल ती शिक्षा पत्करायला तयार आहें.

चंचला : पहा बरं–ठरलं ?

धुरंधर : कबूल–एकदम कबूल–हें पहा, आपण ही धंद्यांतली चुरस ठेवूं थोडी बाजूला न् खाजगी नात्यानं–

चंचला : तुमचं 'खाजगी' बोलणं केव्हां सुरूं होतंय याची वाटच पाहात होतें मी.

धुरंधर : तुमची ती मनीबॅग न् तिच्यावरचे ते रंगीत पट्टे आपल्याला फार आवडले बुवा. थोडक्यांत म्हणजे आपल्या दोघांच्या आवडीनिवडी पुष्कळच जुळतात म्हणायच्या––

चंचला : तें येत चाललंय् माझ्या लक्षांत––

धुरंधर : मला एक गोष्ट विशेष योगायोगाची वाटली ती म्हणजे आपणां दोघांनाहि एकाच शास्त्राविषयीं जिव्हाळा वाटतो !–आपली भेट घडवून आणण्यांत परमेश्वराचा वेगळाच हेतु––

चंचला : हं–माझं लक्ष आहे–बोला तुम्ही––

धुरंधर : तेव्हां–तेव्हां आणखी काय सांगू ? यांत काय तें समजा.

चंचला : समजलं–चांगलं समजलं.

धुरंधर : मी त्या कटिंगवाल्यासारखा फसवा नाहीं. खोटे कंठे आणून द्यायचे असली फसवेगिरी आपल्या हातून नाहीं व्हायची. त्यापेक्षां आम्ही आपले सरळ सांगून टाकूं कीं, हृदयांतल्या प्रेमाखेरीज या जगांत आपल्याजवळ दुसरं कांहींएक नाहीं–ज्याला खरं प्रेम करायचं त्याला कंठ्याची जरुरीच काय ?

चंचला : तुमचं मूळ गांव सांगितलं नाहींत बरं का अजून ?

धुरंधर : आलांत का पुन्हां मूळ गांवावर ? मला वाटतं या चोरीच्या पुराव्यासाठीं आर्यलोक उत्तर ध्रुवापासून निघाले तेव्हांपासून सुरुवात करणार असाल तुम्ही !

चंचला : हेंच का तुम्हांला शास्त्र कळतं ? वास्तविक खरा पुरावा

गोळा करायचा म्हणजे पृथ्वी हा केवळ एक वायूचा गोळा होता, तिथपासून पुरावा शोधीत आलं पाहिजे !

**धुरंधर** ( मान वाकवीत ) : देवी, अज्ञ लेंकरूं आहें मी. शरण आहे तुला ! ( भगवन्तराव प्रवेश करतात. )

**भगवन्त०** : काय धुरंधर—नाटकाचा एकादा प्रवेश बसवतां आहां वाटतं ?

**धुरंधर** : नाही—धंद्यांतली चुरस आहे ही. मी चौर्यशास्त्रांतला तज्ज्ञ आहें हें तुम्हांला माहीत आहेच—

**भगवन्त०** : चौर्यशास्त्रांतले तज्ञ आहां की नाही कुणास ठाऊक! खोटे कंठे शोधून काढण्यांत पटाईत आहां एवढी मात्र आपली खात्री झाली आहे !

**धुरंधर** : खोटा कठा शोधून काढला तसा खरा कंठासुद्धां शोधून काढू. आहे काय त्यांत ? मी काय म्हणत होतों—तर माझ्या शास्त्रीय ज्ञाना-बद्दल या संशय घ्यायला लागल्या—त्यांनासुद्धां हें शास्त्र येतंय्—

**भगवन्त०** : मग आटपलच ! बुद्रुक स्टोअर्समधले सगळे कंठे आता या घरांत दिसायला लागणार बहुतेक !

**धुरंधर** : तेव्हां प्रथम कंठा कोण शोधून काढतो अशी चुरस लागली आहे आमच्यांत.

**भगवन्त** : कठ्याचा नाद द्या आतां सोडून !

**धुरंधर** : वा: आतां तर तुम्हांला दुप्पट जोर आला पाहिजे. एकाच्या ऐवजी दोन इंजनं लागली आहेत !

**भगवन्त** : त्याचा कांही उपयोग नाहीं. मी आतांच गेलों होतों एका ज्योतिष्याकडे. त्यानं प्रश्न पाहून सांगितलं—

**धुरंधर** : अहो, ज्योतिषी काय प्रश्न पाहतो ? प्रश्न पहावे तर आमच्या चंचलाबाईंचे ! पणजोबापासून सुरुवात आहे महाराज ! काय बिशाद आहे कंठा सांपडत नाहीं ?

**भगवन्त०** : कुणाच्या पणजोबापासून ? माझ्या कीं कंठ्याच्या ?

**धुरंधर** : तुमच्या--माझ्या—प्रत्येकाच्या ! या—या भामिनीबाई येताहेत यांच्या सुद्धां ! चंचलाबाई, विचारा त्यांना पणजोबाचं नांव ! (भामिनी येते)-



भामिनीच्या छापील संसारांतील पाहुणचाराची थोडीशी चुणूक !

**भामिनी :** शहर कसलं ? खेडेगांव आहे नुसतं !

**चंचला :** काय, झालं काय ?

**भामिनी :** सगळीं दुकानं पालथीं घातलीं पण एका दुकानांत मिळेल तर शपथ !

**चंचला :** अग पण काय ?

**भामिनी :** तें दुपारीं महाबळांनीं कटिंग नाहीं का आणून दिलं ?

**भगवन्त० :** कटिंग–कटिंग–कटिंग ! कान किटले या कटिंगांनीं–हा महाबळ म्हणजे माझ्या संसाराच्या ट्रेजेडींतला व्हिलन आहे !

**भामिनी (चचलेस) :** तें धुण्याच्या कृतीबद्दलचं कटिंग आठवतंय ना ? त्यांत लिहिल्याप्रमाणं चांगलं वजनदार लाटणं कुठें मिळतंय का पाहायला गेले होते. शेवटीं एका फर्निचरमेकरला स्पेशल ऑर्डर देऊन आले !

**भगवन्त० :** फर्निचरवाला स्पेशल लाटणं आणून देईल तेव्हां माझ्या धोतराचा न् शर्टचा उद्धार होणार वाटतं ? तोंपर्यंत बादलींत तसेच कुजत पडणार ना कपडे ?

**धुरंधर (चंचलेस) :** त्यांना तुमचा तो खास शास्त्रीय प्रश्न विचारा. बघू सांगतां येतंय का पणजोबाचं नांव !

**चंचला :** हें बघ भामिनी–घरांत चोरी झाल्यापासून प्रत्येकानं आपापलं डोकं चालवायला सुरुवात केली आहे. आम्ही परकीं माणसं घरांत पाहुणीं म्हणून आलों असतांना एकादा जिन्नस गहाळ व्हावा न् ज्याच्या त्याच्या मनांत उगीचच कांहीं तरी तर्कवितर्क सुरू व्हावे हें कांहीं बरं नाही. तेव्हां तुला या कंठ्याबद्दल काय माहिती आहे ती नीट आठवून सांग पाहूं.

**धुरंधर :** चंचलाबाई शास्त्र चुकतंय–त्यांनी आपण होऊन कांहीं सांगायचं नाही; तुम्ही एकेक प्रश्न विचारले पाहिजेत ! हं–विचारा. तुमच्या पणजोबाचं नांव काय ?

**भगवन्त० :** मघांपासून हा एक नवीनच पणजोबा कुठून उत्पन्न झालाय तें समजत नाहीं !

**चंचला :** धुरंधर, तुम्ही आतां मधेंमधें बोलूं नका. माझ्या शास्त्राप्रमाणं मला काय करायचं तें मी करीन. तुम्ही आपले भिंतीवर हातोडे मारीत बसा !

**भगवन्त० :** काय भिंतीवर हातोड्याचे घाव ? पाहतों ना भिंतीला कोण हात लावतंय तें !

**धुरंधर :** छे, छे—कसली भिंत न् कसला हातोडा—त्या माझी थट्टा करीत होत्या ! हं—चालू द्या तुमची जबानी.

**चंचला :** ह—सांग. कंठा कुठे ठेवला होतास ? या कपाटांत ?

**भगवन्त० :** चंचलाबाई, हिला प्रश्न विचारणं म्हणजे उगीच वेळ फुकट घालवणं आहे ! सकाळपासून मी हिला कमी का प्रश्न विचारले आहेत ? सारखे प्रश्नच विचारतों आहे. पण सरळ उत्तरं द्यायची नाहीत असं जिथें तिनं एका पुस्तकांत वाचलंय !

**भामिनी :** जरा मला बोलू द्याल का ? (चंचलेस) हो, या कपाटांत.

**चंचला :** पुस्तकाच्या कपाटांत कंठा ठेवायचं काय कारण ग ?

**भगवन्त० :** मी सांगतों त्याचं कारण (कानशिलाजवळ बोट ठेवून स्क्रू खूप पिळल्याचा आविर्भाव करतो ! )

**चंचला :** भगवन्तराव, तिला बोलू द्या ना. तुम्ही तिला असें डिव-चतां न् मग ती चिडते—

**भगवन्त० :** बरं—तिला बोलू दे. बोल—तूं बोल हं ! मी आपला तोंड वळवून बसतों.

**चंचला :** हं—सांग, या कपाटांत कंठा कां ठेवलास ?

**भामिनी :** त्याला तसंच महत्त्वाचं कारण होतं.

**भगवन्त० :** कबूल, एकदम कबूल. पण तें महत्त्वाचं कारण कोणतं तें कळायला हवं. खरं कीं नाहीं धुरंधर ?

**चंचला :** कोणतं महत्त्वाचं कारण ?

**भामिनी :** तें मी यांच्या देखत नाहीं सांगणार—आंत चल, तुला एकटीला सांगते !

**भगवन्त० :** नाहीं—नाहीं. सगळा साक्षीपुरावा कोर्टीत उघड उघड होऊं द्या; चेंबरमधें नको ! काय धुरंधर ?

**धुरंधर :** बोलूं नका—चंचलाबाई रागावतील ना ?

**चंचला :** आंत कशाला ? सांग इथेंच. सगळी घरचीच मंडळी आहेत.

**भामिनी :** इकडे ये—तुझ्या कानांत सांगते !

**भगवन्त०** : I object, your Honour. न्यायाधिशाच्या कानांत साक्ष द्यायची ही रीत आम्ही कधी पाहिली नव्हती ! तुम्ही पाहिली होती कधीं धुरंधर ?

( धुरंधर भगवन्तरावाना हातानें खाली बसवतो. )

**चंचला** : कानांत कशाला—मोठ्यानें सांग.

**भगवन्त०** : अरेरे, आयत्या वेळीं मैत्रीण सुद्धां उलटली ना !

**चंचला** : चटकन् सांगून टाक ना ? म्हणजे उलगडा तरी होईल—

**भामिनी** : तू म्हणजे अश्शी आहेस !

**चंचला** : हं बोल लवकर—

**धुरंधर** : याला म्हणावं जबानी ! चंचलाबाई, आपण खूष आहों बुवा तुमच्यावर—म्हणजे तुमच्या जबानीवर !

**भामिनी** : मग सांगितलंच पाहिजे का ?

**भगवन्त०** : काय गंमत आहे पहा ! लग्नांत नवऱ्याच नांव घेतांना सुद्धां इतके आढेवेढे घेतले नव्हते हिनं !

**चंचला** : हो—हो—सांगितलंच पाहिजे.

**भामिनी** : कंठ्याचे मोतीं वाळायला मी ते या कपाटांत ठेवले होते !

(महाबळ येतो)

**महाबळ** : चंचलाबाई, आलों मी !

**भगवन्त०** : या, या—अगदीं वेळेवर आलांत ! हं—वही काढा लवकर—

**महाबळ** : म्हणजे कंठा सांपडला वाटतं ? (घाईनें जाऊं लागतो)

**भगवन्त०** : जातां कुठें ? मी सांगतों तें मुकाट्यानं घ्या टिपून. ‘ कंठ्याचे मोतीं वाळण्यासाठीं मी ते या पुस्तकाच्या कपाटांत ठेवले होते.—’ हं, घ्या टिपून ! चंचलाबाई, चालू द्या पुढं !

**चंचला** : मोती वाळायला ? नीटसं नाहीं लक्षांत येत.

**धुरंधर** : मोती न् वाळायला ? अहो, मोती म्हणजे काय ओले कपडे आहेत का भिजलेले हरभरे आहेत वाळत ठेवायला ?

**महाबळ** : भामिनीबाई, मोती वाळीत कसे ठेवले होते तें नीट सांगा; म्हणजे “ मोती वाळत टाकण्याच्या अभिनव पद्धति ” असं हेडिंग घालून देतों ही सगळी माहिती “ शंखध्वनींत ” ! मोती दोऱ्यांत ओंवून ती दोरा

दोन खांबांत बांधून ठेवलात कीं वाल–हरबऱ्यासारखे मोती जुनेऱ्यावर पसरून ठेवलेत ? सांगा !

**चंचला :** हं, सांग–वाळायला म्हणजे रिठ्यांच्या पाण्यांत धुतलेस की काय ?

**भामिनी :** नाहीं.

**भगवन्त० :** हं-महाबळ; घ्या टिपून! 'रिठ्याच्या पाण्यांत धुतले नव्हते!"

**चंचला :** मग काय लावलं होतंस मोत्यांना ?

**भामिनी :** कांहीं नाहीं! (एकीकडे चंचलेस ' थांब ग, विचारूं नकोस ' असें खुणावते.)

**भगवन्त०** (महाबळास) : हं–लिहा. ' मोती वाळत ठेवले होते, पण त्यांना कांही लावलं नव्हतं.' चंचलाबाई, ही हिचीं सरळ उत्तरं बरं का ! ऐकून ठेवा मला रोज कसल्या आपत्तींना तोंड द्यावं लागतं तें !

**चंचला :** हें बघ, हा घोटाळा उलगडायचा असेल तर सगळं कांहीं न लपवतां सांगून टाक पाहूं.

**भामिनी :** मोत्यांना–त्याचें–तें–हें–लावलं होतं !

**भगवन्त०** (महाबळास) : असं बावरल्यासारखं काय करतां आहां ? लिहा ! ' मोत्यांना त्याचं तें–हे–लावलं होतं ! '

**चंचला :** सांग ना सरळ. तें म्हणजे काय न् हें म्हणजे काय ?

**भामिनी :** अंड्याचा–हें–अंड्याचा–रस—

**महाबळ :** वा वा–काय सुंदर शब्द आहे पण ! अंड्याचा ' रस ' ! कॉंग्रॅच्युलेशन्स, भामिनीबाई! अहाहा, अंड्याचा रस !

**धुरंधर :** का महाबळ– तोंडाला पाणी सुटलं वाटंत ?

**भगवन्त०** (गंभीरपणें पुढें येत) : हें पहा, चंचलाबाई, इतका वेळ मी या तुमच्या साक्षीपुराव्यांत एक अक्षरसुद्धां बोललों नाहीं.

**भामिनी :** तरी बरं, प्रत्येक शब्दागणिक तुमचं कांहीं तरी तुणतुणं चाललं होतं म्हणून !

**भगवन्त० :** तुमच्या जबानींत मी व्यत्यय आणला नव्हता. पण घरांत अंडीं येऊं लागल्याचं ऐकतांच मला पुढें येणं भाग पडलं !

**धुरंधर :** इतकीं का तुम्हांला अंडीं आवडतात ?

**भगवन्त०** : ऐका हो–घरांत अंडीं येणं ही नुसत्या साक्षीपुराव्याची बाब नाहीं. हा धर्माचा प्रश्न आहे–संस्कृतीचा प्रश्न आहे !

**महाबळ** (टिपून घेत) : तीन उद्‌गारचिन्हं आणि कंसांत—

**धुरंधर** : टाळ्यांचा कडकडाट !

**भगवन्त०** : आतां बोला–ही अंड्यांची चोरटी आयात किती दिवस चालली आहे ?

**धुरंधर** : भगवन्तराव, तुम्ही नका प्रश्न विचारू. तुम्हांला आमचं शास्त्र कुठें येतय् ? तुम्ही नुसतेच प्रश्न विचारतां ! चंचलाबाईंना प्रश्न विचारूं द्या. त्यांना शास्त्रहि येतं न् प्रश्नहि विचारतां येतात !

**महाबळ** : थांबा–चचलाबाईंना कोणतं शास्त्र येत म्हणालांत ? चचलाबाई, एक मुलाखत लागू झाली बर का—

**भगवन्त०** : हं–बोला अंडीं किती दिवस येताहेत ?

**भामिनी** : रतीब लावला आहे रोजचा ! समजल ?

**भगवन्त०** (चचलेस) : पाहिलंत ?–हें हिच सरळ उत्तर !

**चंचला** : तुम्ही सगळे गप्प बसा पाहूं. भामिनी, सांग—

**भामिनी** : अग, अंड्यांचा रस मोत्यांना लावून ते आठ तास मोकळ्या हवेंत वाळत ठेवले कीं त्यांची गेलेली चकाकी पुन्हां येते असं—

**भगवन्त** : एका पुस्तकांत वाचलं–होय ना ? वाटलच मला !

**चंचला** : अस्सं. तूं पुस्तकांत वाचलस न् उघड्या कपाटांत मोती वाळत ठेवलेस–असंच ना ?

**भामिनी** : होय–तिथून कंठा गेला—

**भगवन्त०** : हं. नाहीं गेला तरच नवल !

(चंचला कटिंगवरून नजर फिरवते. सोपानाला हांका मारून त्याला कांहीं तरी सांगते. सोपाना बागेंतून खोरें, पहार, कुदळ वगैरे साहित्य गोळा करून आणतो.)

**चंचला** : तुम्ही सर्वजण इथेंच थांबा–मी आलेच !

**धुरंधर** : चंचलाबाई, मी येतों तुमच्या बरोबर. मी तुमच्याइतका नाहीं तरी थोडाफार शास्त्रप्रवीण आहें. एकमेकांस मदत होईल आपली !

**महाबळ** : त्यांचं एकट्यांचं शास्त्र पुरेसं आहे; धुरंधर तुमची मदत

नको त्यांना. हें पहा चंचलाबाई, तुमच्या या शास्त्रप्रयोगाची सगतवार हकीकत हवी आहे आमच्या शंखध्वनीसाठीं; तेव्हां मीच येतों तुमच्याबरोबर !

**चंचला :** नको–कुणींच यायला नको. हं, चल रे सोपाना (सोपाना व चंचला स्वयंपाक घराकडे जातात. भामिनी भगवन्तरावांकडे रागानें पाहात माडीवर जाते.)

**धुरंधर :** काय महाबळ, आत्तां तुम्ही मोकळे कसे ? सुटी आहे वाटतं शंखध्वनीला ?

**महाबळ :** कसली घेऊन बसलां आहां सुटी ? वर्तमानपत्र कायमचं बंद पडेल तेव्हाच सुटी मिळायची आम्हांला ! आज तर रोजच्यापेक्षां जास्तच काम होतं. आत्तां संध्याकाळी आमचा जादा अंक निघालाय ना ? त्याचं काम आटोपूनच मी इकडे आलों—

**भगवन्त० :** जादा अंक ?–तो कां बुवा ?

**महाबळ :** तुमच्या या चोरीच्या बातमीसाठी. असा खपेल म्हणता–अशा वेळी एकेका अंकाचे दोन दोन आणेसुद्धां कमावतों आम्ही !

**भगवन्त० :** काय न्याय आहे पहा! आमची चोरी झाली म्हणून आम्ही हळहळत बसलों आहों–न् त्याचा जगभर डांगोरा पिटून हे त्यावर पैसा कमावताहेत !

**महाबळ :** आमचा धदाच असा आहे. जगांत सगळे व्यवहार जर सुरळीत चालायला लागले तर आम्ही वर्तमानपत्रांनी जगायचं कशावर ? समजा तुमच्या घरी चोरी झालीच नसती तर आम्ही काय छापलं असतं ?

**धुरंधर :** खोटंच छापाल चोरी झाली म्हणून; नेम नाही तुमचा ! पाहूं बरं चोरीची माहिती काय दिली आहे ती ? (अंक उलगडून पहात) हें काय हो ?–याचा अर्थ काय बुवा ? (वाचतो) "चिनी जपानी युद्धास सोंड"–म्हणजे काय ? अगदीं पानभर हेडिंग घातलं आहेत—

**भगवन्त० :** युद्धाला सोंड नाहीं बुवा कुठें ऐकिली !

**महाबळ (ओशाळून) :** अं–हं, 'सोंड' नाहीं–'तोंड' आहे. 'चिनी–जपानी युद्धास तोंड' असं वाचायचं !

**धुरंधर :** पण तसं लिहिलं असेल तर वाचायचं ना ? (वाचतो) न्

हें काय ? “पीत नदीचा जलप्रणय” छान ! आतां नद्यासुद्धां प्रणय करूं लागल्या म्हणायच्या !

**महाबळ** : तुमच्या आलंच असेल लक्षांत ‘प्रळय’ म्हणून–(हा व या खालचा सवाद चालू असतां स्वयंपाकघराच्या बाजूनें कुदळीचे आवाज मधून मधून ऐकूं येतात. भगवन्तराव ते आवाज ऐकून आंत जाऊं लागतात. व धुरधर “अहो, चंचलाबाईंच्या शास्त्रांत तुम्ही अडथळा आणूं नका” असें म्हणून त्यांना बसवतो.)

**भगवन्त०** : मी फारसं कांही वाचीत नाहीं. पण मागें एकदां कुठे-तरी अशी एक गोष्ट वाचलेली आठवते आहे–

**धुरंधर** : मी सागतों–‘कपाझिटरचा सूड.’ काय हो महाबळ, तुमच्या छापखान्यांतल्या कपॉझिटरचं न् संपादकाचं असंच भांडण झालेलं दिसतंय !

**महाबळ** : आमच्या धंद्यांतलं वैगुण्य आमच्याच तोंडानं आम्ही सांगूं नये. पण एक दोन पत्रं सोडून गांवांतल्या सगळ्या वर्तमानपत्रांतून हे रोजच्या रोज असं चाललय. बडोद्याच्या जोश्यांच्या स्वप्नांतसुद्धां येणार नाहीत असले मुद्राराक्षस दररोज थैमान घालताहेत !

**धुरंधर** (वाचीत वाचीत एकीकडे): तें दिसतंच आहे. “निवड-णुकींत प्रचंड विनय” न् हें काय ? “गिरणी कामगारांचा बैठा पंप !” —“पठाणाच्या गळ्यावर पुरीनें वार !”

(महाबळ ओशाळून त्याच्या दुरुस्त्या करतो.)

**भगवन्त०** : आतां तुम्ही आम्हांला दुरुस्त्या करून सांगतां आहां–पण तुमचा अंक वाचणाऱ्या प्रत्येक वाचकाला हें असलं चालतं बोलतं शुद्धिपत्र कुठून मिळायला ?

**महाबळ** : जादा अंक काढायचा म्हणजे अशा चुका होतातच. घाई-घाईनें छापून काढायचं—

**धुरंधर** : अहो, घाईघाईनें बोललांत तरी नाहीं अशा चुका व्हायच्या कधीं !

**भगवन्त०** : धुरंधर, आपल्या चोरीची बातमी तरी नीट छापली आहे का पहा बरं !

(धुरंधर अंकांतून बातमी शोधून काढतो–स्वतःशींच वाचतो–त्याचें हंसू अनावर होतें; तें कसेंबसें दाबतो आणि अंकाची घडी करतो.)

**भगवन्त०** : कां हो ? वाचा ना !

**धुरंधर** : आपण नाहीं वाचत–तुम्हीच वाचा हवी तर !

**महाबळ** : थांबा मीच वाचून दाखवितों. एकदम दुरुस्त्या करूनच वाचतो !

**भगवन्त०** : आणा पाहूं इकडे तो अंक. मीच पाहतों काय छापलं, आहे तें. (वाचतो.) " मौल्यवान कठ्याची मोरी " (महाबळ 'चोरी असें पुटपुटतो.) " आमच्या खास चोरप्रतिनिधीकडून. " हे चोरांचे प्रतिनिधी म्हणजे तुम्हीच कां हो महाबळ ? (वाचतो) "येथील सामान्य नागरिक" मी सामान्य काय ? थांबा खेचतों कोर्टात न् दाखवतों कोण आहे तें !

**महाबळ** : सामान्य नाहीं–तुम्हांला सामान्य नागरिक कोण म्हणेल ? उलट मी तर " सन्मान्य " असं विशेषण लावलं मुद्दाम !

**भगवन्त०** : आग लावा तुमच्या त्या विशेषणांना! (वाचतो) " कायदे-पंडित श्री. भं. पा. कुलकर्णी–" भगवन्त पांडुरंग म्हणजे भं. पा. वाटतं ?

**धुरंधर** : अहो नशीब समजा 'गं. भा.' नाही लिहिलं !

**महाबळ** : मला बोलून काय फायदा ? मीं लिहितांना सगळं बरोबर लिहून दिलं होतं–त्याच्यावर छापखान्यांत काय काय सस्कार झाले ते मला काय ठाऊक ! त्यांनीं मलासुद्धां चोरांचा प्रतिनिधि नाही का बनवलं ?

**भगवन्त०** : पण म्हणून मी हें सगळं निमूटपणें सहन करूं वाटतं !

**महाबळ** : असं करा. तुम्ही एक खुलासा लिहा. उद्यांच्या अंकांत 'चुकीची दुरुस्ती,' 'दिलगिरी' असं कांहींतरी नांव देऊन आम्ही तो छापून टाकूं !" मग तर झालं ?

**भगवन्त०** : नांव काढूं नका पुन्हां कांहीं छापायला द्यायच! (वाचूं लागतात) " कुळकर्णी यांचा दीड रुपये किमतीचा मौल्यवान् कंठा "–तुमच्यासारखे सगळेच जण 'बुद्रुक स्टोअर्स' मधून कंठे नाहीं आणत–सम-जलां ? किमत दीड रुपये !

**महाबळ** : 'दीड'च्या पुढें 'हजार' चुकून राहिला !

**भगवन्त०** : तुमचा राहिला 'हजार' पण आमची गेली अब्रू त्याची

वाट काय? (वाचतात) "कंठा सकाळपासून चोरीस गेला आहे. श्री. कुळकर्णी त्याच तमाशांत हिंडत असून त्यांचा अद्याप पत्ता नाही." याचा अर्थ काय, बोला (संतापानें थरथर कापूं लागतात.)

**महाबळ :** तमाशांत नव्हे—तपासांत; आणि त्यांचा पत्ता नाहीं म्हणजे—

**धुरंधर :** म्हणजे तमाशांत गेलेल्या भगवन्तरावांचा, होय ना?

**महाबळ :** तसं नाही हो, मी नीट समजून सांगतों. कुळकर्णी त्याच तपासांत आहेत. पण अजून त्यांचा—म्हणजे त्याचा—म्हणजे त्या कंठ्याचा पत्ता नाहीं—

**धुरंधर:** बाप रे, काय अन्वयार्थ हे! लहानपणी मोरोपंताच्या आर्यांनी सुद्धां इतका त्रास दिला नव्हता कधी!

**भगवन्त० :** (वाचतात) "त्यामुळे त्यांना सकाळपासून बाप आल्यासारखेहि वाटत आहे असें समजतें." बाप आला आहे असें समजतें होय? कोणाचा बाप आल्यासारखं वाटत तें दाखवतों आतां—म्हणजे नीट समजेल!

**महाबळ:** सांगितलं ना एकदां? मला सुद्धां तुमच्या इतकाच राग येतो न् वाईट वाटतं. पण आमचं काम बातमी नेऊन देण्याचं. त्याच्यापलीकडे आमचा कांही संबंध नाहीं. आतां 'ताप आला' असं मी लिहिलं तिथें 'बाप आला' अस त्यांनीं छापलं त्याला मी काय करणार?

**भगवन्त०** (वाचीत) : "या कंठ्याच्या चोरीसंबंधीं अधिक माहिती आम्ही लवकरच देणार आहों. पण तूर्त इटालियन सरकारकडून या प्रश्नासंबंधी कांहींच उत्तर आलें नसून आज मुख्य प्रधान पार्लमेंटमध्यें याचा जास्त खुलासा करतील असा अंदाज आहे." (खुर्चीवर मट्कन बसतात) हें मी काय वाचतों आहे! खरोखरीच असं छापलेल आहे का माझ्या डोळ्याच्या बाहुल्याच एकाएकीं उलट्या झाल्या आहेत? मी खुलासा करायच्या आधीं इंग्लंडचा मुख्य प्रधान खुलासा करणार न् तो सुद्धां पार्लमेंटमध्यें! न् इटलीचं अजून उत्तर आलं नाही? म्हणजे आमच्या घरांतला कंठा घेऊन चोर इतक्यांत इटलीला जाऊन पोंचला कीं काय?—धुरंधर, हें काय आहे?

**धुरंधर :** भगवन्तराव आम्ही स्वतःला तर्कपंडित म्हणवून घमेंड मारीत आलों खरे, पण आमच्या तर्कशास्त्राला सुद्धां न उलगडणाऱ्या गोष्टी आहेत या! आपण या संदर्भग्रंथालाच शरण जाऊं या! हं—महाबळ—बोला अन्वयार्थ!

**महाबळ :** या शेवटच्या वाक्यांचा तुमच्या चोरीशी कसलाच संबंध नाहीं. या शेजारच्या कॉलमांत अँग्लो–इटालियन कराराची बातमी आहे. त्या बातमींतल्या दोन ओळी उरल्या त्या या तुमच्या चोरीच्या बातमी-खालीं घातल्या ! दोहोंच्यामध्यें रेघ घालावयाची तेवढी राहिली !

**धुरंधर :** एक रेघ राहिली खरी पण त्यांत घोटाळा केवढा माजला ! हा कंठा धाडकन् पार्लमेंटमध्यें शिरला त्याची वाट काय ? इतके दिवस तुमचा ' शंखध्वनि ' हातांत घेऊन पाहिला नव्हता तेंच बरं होतं—आज एकच अंक पाहिला तर डोळे पांढरे व्हायची वेळ आली !

**भगवन्त० :** आतां आलं लक्षांत. अलीकडे ही दैनिकं फार निघाल्या-पासून हृदयविकारानं न् रक्तदाबानं एकाएकी पटापट माणसं कां मरायला लागली त्याचं कारण आतां लक्षांत आलं !

**धुरंधर :** तुमचे हे वाचक रोज हें असल वाचतात ?

**महाबळ :** हा संवयीचा प्रश्न आहे. लगडत चालायचीच सवय झाली म्हणजे सरळ चालणंच अवघड जात !

**भगवन्त० :** माझं तर हें वाचून डोकं भणभणायला लागलं आहे. आमची ही तुमचा शखध्वनि रोज वाचते ना ?—तरीच असं डोक फिरल्या-सारखं करते बरं का !

(सोपाना धोतर वर कसून हातांत कुदळ घेऊन घाम पुशीत येतो. त्याच्या मागोमाग चंचला येते. )

**चंचला :** भामिनी कुठें गेली ?

**भगवन्त० :** फर्निचरमेकरला लाटण्याचा तगादा करायला गेली असेल बहुतेक—

**धुरंधर :** नाही, नाहीं,–त्या वर आहेत. चंचलाबाई, माझ्याबरोबर चला, मी दाखवतों.

**महाबळ :** चंचलाबाई, मी आतां मोकळाच आहे बरं का–आपलं तें काम राहिलंच आहे अजून !

**चंचला :** सोपाना, वर जाऊन बाईसाहेबांना बोलावून आण—

**महाबळ :** थांब सोपाना, ती कुदळ खाली ठेवूं नकोस ! पांच मिनिटें

असाच उभा राहा. आमच्या खास फोटोग्राफरकडून तुझ्या या 'पोज' चा फोटो घेऊन ठेवतों ! आरोग्य अकाच्या कव्हरवर छापायला छान आहे पोज ! !

**भगवन्त०** : तुमचा आरोग्य अंक राहू द्या हो बाजूला–चंचलाबाई, इतका वेळ आम्ही सगळेजण इथं खोळंबून उभे आहों. सांगा पाहू काय झालं तें—

**धुरंधर** : बोला–काय झाल ?–मुलगा की मुलगी ?

**चंचला** (मूठ उघडून दाखविते) : हें पाहिलंत ? जा, सोपाना–उभा काय राहिलास ? (सोपाना जातो.)

**भगवन्त** : नाही, अजून विश्वास ठेवायला मी कबूल नाही. हा कंठा तरी खरा कशावरून ? बुद्रुक स्टोअर्समधला नाही कशावरून ?

**चंचला** : सांगते ना सगळं—

**महाबळ** : थांबा हं. मी एवढं पेन्सिलीचं टोंक करतों–मग करा सुरुवात !

**भगवन्त०** : महाबळ, मुकाट्यानें पेन्सिल खिशांत टाका पाहूं. या घरांत याच्यापुढें तुम्ही कागदावर एक अक्षरसुद्धां लिहून घ्यायचं नाही !

**धुरंधर** : एक शब्द तर लिहा–मग सोपाना आहे न् बद्धासन आहे ! आलं ध्यानांत ?

**महाबळ** : बरं बुवा–ही ठेवली पेन्सिल खिशांत. तुम्ही तर वाघाचीं नखंच काढून घेतां आहां ! (भामिनी येते.)

**चंचला** : अग, कंठा सांपडला–हा बघ (मोती दाखवते) काय धुरंधर–पैज लक्षांत आहे ना ?

**भगवन्त०** : कसली पैज ?

**चंचला** : आमच्या दोघांपैकी जो कोणी अगोदर कंठ्याचा शोध लावील त्यानं दुसऱ्याला शिक्षा करायची—

**महाबळ** : चंचलाबाई, मी सुचवितों एक नामी शिक्षा. बद्धासन करायला सांगा त्यांना !

**धुरंधर** : पण अगोदर कठा खरा आहे की नाही हें तर ठरूं द्या.

**भगवन्त०** : हो–तें आहेच महत्त्वाचं—

**भामिनी** : हाच–हाच कंठा तो–शंकाच नाहीं—

**महाबळ** : तुम्ही बुद्रुक स्टोअर्समधला कठा पाहून सुद्धां असंच म्हणत होतां बरं का !

**चंचला :** ऐका हं धुरंधर–भामिनीनं मोत्यांची चमक वाढावी म्हणून त्यांना अंड्याचा—

**महाबळ :** रस लावला–वा–वा–छान शब्द !

**चंचला :** आणि मोती वाळत ठेवले. अंड्याच्या वासानं रात्री उदरांनीं तो कंठा कपाटांतून लांबवला.

**धुरंधर :** चंचलाबाई, तुम्ही या शास्त्रांत फारच तरबेज दिसतां–म्हणजे आंत जाऊन उंदरांची जबानी घेत होतां वाटतं ?

**चंचला :** न् या भिंतीत बिळ आहे त्यांत नेऊन ठेवला—

**धुरंधर (चंचलेस) :** पाहिलंत ? उगाच नव्हतों मी मघाशी हातोडीनं भिंती ठोकीत ! चोरवाटा–भुयार–बिळं–माझा तर्कच अखेर खरा ठरला–अखेर–भिंतींतच कंठा निघाला !

**महाबळ :** जय आलख धुरंधर–जय आलख धुरंधर !

**भगवन्त० :** पण उंदरांनीं कंठा नेला असेल अशी कल्पना तरी तुम्हांला कशी सुचली ?

**चंचला :** त्याला कारण–महाबळांचं कटिंग.

**महाबळ :** कोणतं ! धुण्याच्या कृतीबद्दलचं ना ? होतंच तसं महत्त्वाचं !

**चंचला :** तें नाहीं–मघाशीं आणून दिलंत तें–घरं स्वच्छ कशीं करावींत त्याबद्दलचं—

**भगवन्त० :** आतां तुम्ही सुद्धां या कटिंगवाल्याच्या नादीं लागलांत कां !

**भामिनी :** महाबळ, कटिंग मला द्यायचं का चंचलेला ?

**महाबळ :** तुम्ही घरीं नव्हतात–म्हणून त्यांच्याजवळ देऊन ठेवलं.

**भगवन्त० :** मग काय–उंदीर मोत्यांचे कंठे बिळांत नेतात असं लिहिलं होतं वाटतं त्या कटिंगमध्यें ?

**चंचला :** तसं नाहीं; बिळं बुजवावीं–जमीन सारवावी अशा सूचना होत्या त्यांत–त्यावरून मला कल्पना सुचली.

**भामिनी :** म्हणजे महाबळांच्या कटिंगमुळेंच कंठा सांपडला !

**धुरंधर :** पण त्यांनीं नुसतं कटिंग द्यायच हेलपाट्याचं काम केलं–कटिंगचं महत्त्व त्यांना काय कळणार आहे ? काय महाबळेश्वर ?

**चंचला :** हं–आतां तरी पैज हरल्याचं कबल करतां का ?

**धुरंधर :** वास्तविक माझ्या मनाचं तितकंसं शास्त्रीय समाधान झालेलं नाही–तुम्हांला हे मोती सांपडलेले आहेत–पण कंठयाचं काय ? आमचं शास्त्र असं सांगतं की, कंठा हरवला म्हणजे कठाच सांपडला पाहिजे !

**भगवन्त० :** आतां करानात कबूल हरलों म्हणून !

**महाबळ :** नाहीं तर सोपाना आहे न् बद्धासन आहे !

**धुरंधर :** बरं बुवा ! पैंज हरलों, कबूल.

**चंचला :** आतां शिक्षा. तुम्हांला शिक्षा ही कीं, आजपासून दोन वर्षं–

**महाबळ :** चचलाबाईंना भेटणार नाही–पत्र पाठविणार नाही–हं म्हणा !

**चंचला :** आजपासून दोन वर्षं चौर्यशास्त्राचं नांव सुद्धां तोंडांतून काढणार नाही–दोन वर्षं हें संशोधन–हे तर्कवितर्क सगळं कांही बंद !

**भगवन्त० :** छान, छान; धुरंधर, आतां दोन वर्षं तरी तुमचा पणजोबा दडी मारून बसेल ! छान. पसंत आहे शिक्षा.

**धुरंधर :** काय ही अघोर शिक्षा ! बरं कबूल आहे.

**भगवन्त :** नुसतं कबूल म्हणून काय होणार ? नेम काय तुमचा !

**धुरंधर :** हवं तर चंचलाबाईंना वचन देतों ! मग तर झालं ? चंचलाबाई हे घ्या वचन. (तिचा हात हातांत घेण्यासाठी पुढें होतो.)

**चंचला :** दिलेलं वचन मोडतां येत नाही की काय ?

**धुरंधर :** मग कशी खात्री पटवू ? हां हवं तर मी शस्त्रसंन्यास घेतों–मग तर झालं ?

**भगवन्त :** घ्या, घ्या, संन्यास जरूर घ्या !

**धुरंधर :** चंचलाबाई, मी यापुढं दोन वर्षं हें चौर्यशास्त्र सोडून दिलं आहे. त्याची साक्ष म्हणून हे माझं शस्त्र मी दोन वर्षं तुमच्याजवळ ठेवतों. (तोंडांतला पाईप चंचलेच्या पायावर ठेवतो.)

**महाबळ :** वा वा रे शस्त्र ! काय छान वर्णन करतां येईल याचं ! (वही–पेन्सिल काढूं लागतो.)

**भगवन्त० :** अहो ! पेन्सिल खिशांत घाला आधीं. तुमचा शस्त्रसंन्यास आधींच झाला आहे—धुरंधर, पाईप हें तुमचं शस्त्र होय ?

**धुरंधर :** होय, 'शेरलॉक होम्स' एवढा मोठा डिटेक्टिव्ह—पण एवढा मोठा कसा झाला–जो पाईप ओढीत असेल म्हणून !

**महाबळ :** म्हणून ह्या गांवठी 'शेर लॉक-होम्स' नें सुद्धां पाईप घेतला वाटत ?

**चंचला :** उद्यांपासून शिक्षा सुरू. न् महाबळ, आहे ना लक्षांत !

**भगवन्त :** म्हणजे ? महाबळांना सुद्धां शिक्षा ठरली आहे वाटतं ?

**महाबळ :** छे छे—

**चंचला :** हो—त्यांनीं मला सकाळीं लग्नाची मागणी घातली ना त्याबद्दल.

**महाबळ :** शिक्षा नाही—स्वार्थत्याग आहे तो !

**धुरंधर :** वाः रे स्वार्थत्याग! द्राक्षं आंबट निघालीं वाटत !

**चंचला :** महाबळांनीं असं कबूल केलं आहे की आजपासून दोन वर्षं मला भेटायचं नाहीं—पत्रं पाठवायचीं नाहींत.

**भगवन्त० :** चंचलाबाई, तुमच्या शास्त्रीय अभ्यासामुळें—

**चंचला :** कसला आलाय शास्त्रीय अभ्यास? अंड्याच्या वासानं उंदीर कंठा नेतील हें समजायला शास्त्र नको, मुलाखत नको की तोंडांत पाईप नको ! साध्या व्यवहारी माणसाला सहज सुचणारी ही गोष्ट आहे.

**भगवन्त० :** तरी पण तुमच्यामुळें हा कंठा सांपडला.

**भामिनी :** विसरलांत वाटतं ? अहो, हिनंच तर तो चोरला—

**भगवन्त० :** तें काय मनावर घेतां तुम्ही ? असं आहे, संकटांत सांपडलेला माणूस ज्याच्या त्याच्यावर खेंकसतो—चालायचंच. चंचलाबाई, मी जें जें कांहीं कमी जास्त बोललों असेन तें मनावर घेऊं नका.

**चंचला :** नुसतं असं म्हटल्यानं नाहीं माझा राग जायचा. मी फार फार रागावले आहें.

**भगवन्त० :** मला फार वाईट वाटतें—आतां मी काय केलं म्हणजे तुमचा राग जाईल ?

**चंचला :** सांगूं ? आमच्या संस्थेसाठीं दोनशें रुपयांची देणगी द्या.

**भगवन्त० :** दोनशें रुपये म्हणजे थोडे जास्तच नाहींत का ? चंचलाबाई, आम्ही आपलीं मध्यम स्थितींतलीं माणसं.

**चंचला :** कंठा सांपडला नसता तर दीड-हजाराची ठोकर बसली असती—त्या मानानं दोनशें रुपये म्हणजे—

**भगवन्त० :** ठीक आहे. मी देणगी देण्याचें आश्वासन देतों.

**चंचला :** आश्वासन नको. मला देणगी हवी आहे.

**महाबळ :** भगवतराव, निदान ही तरी—बातमी घेऊं का टिपून ?

**धुरंधर :** बोलावू का सोपानाला ?

**महाबळ :** भगवंतराव, तुम्ही जसं देणगी देण्याचं आश्वासन दिलं तसं मी सुद्धां तुम्हांला बातमी नीट छापण्याचं आश्वासन देतों ! मग तर झालं ?

**भगवन्त० :** माझं नुसतं आश्वासन नाही. तें मी खरं करून दाखविणार आहें. अर्ध्या तासाच्या आंत दोनशें रुपये त्यांच्या हातीं पडतील. (भामिनीकडे) हें बघ. हें सगळं वादळ शांत झालं आहे तेव्हां—

**भामिनी :** मी नेहमींच तसं म्हणते. पण तुम्ही जेव्हां तेव्हां—

**भगवन्त० :** आलं ध्यानांत. आतां शब्दाला शब्द वाढवीत बसू नकोस.

**चंचला :** भामिनी कंठा सांपडला; आतां फीस्ट पाहिजे.

**धुरंधर :** कंठा सांपडला म्हणू नका. अजून कंठा कुठं सांपडला आहे. नुसते मोतीच सांपडले आहेत !

**चंचला :** पण तुम्ही पाहिजे तर फीस्टला नका हजर राहूं.

**महाबळ :** हां—ही तोड छान आहे.

**धुरंधर :** माझा शास्त्रीय–तात्त्विक विरोध आहे—अंडर प्रोटेस्ट फीस्ट झोडायला काय हरकत आहे !

**भगवन्त (भामिनीस) :** मग कसला बेत ठरवतां ? पोळीशीं तूप साखर ?

**महाबळ :** नो नो, साफ नाकबूल.

**भगवन्त :** बरं आज बरणींतला मोरंबा काढू.

**धुरंधर :** पुन्हां कंठा हरवेल असा शाप मिळेल बरं का अशानं !

**भगवन्त :** बाप रे—तसं नको—काय हवं तें मागा बाबांनो.

**भामिनी :** चालूं द्या तुमच्या सूचना. पण मी केव्हांपासून बेत नक्की करून ठेवला आहे.

**भगवन्त :** शाबास. याला म्हणावं गृहिणी.

**चंचला :** काय पक्वान्न आहे कळूं द्या तरी ?

**भामिनी :** खास पक्वान्न निवडून काढलंय ! ' निवडुंगाचा रस्सा ' !

**भगवन्त०** (घाबरून) : काय ? निवडुंगाचा रस्सा? माझ्या पोटांत आतांच कांटा उभा राहिला आहे!

**धुरंधर :** माझा विरोध कायम. आम्ही फीस्ट घेणार नाहीं !

**महाबळ :** मी अलीकडे लंघनचिकित्सेला सुरुवात केली आहे!

**चंचला :** मी काशीला गेले होते, तेव्हां निवडुंगं सोडलीं आहेत!

**भामिनी :** तें कांही चालणार नाहीं. तुम्ही सगळे जण कांहींतरी सबबी काढून निसटूं पाहातां आहांत—पण पहा तर खरं ! कसा फक्कड रस्सा करते तें.

**धुरंधर :** रस्सा करा. पण कांदेबटाटयांचा करा. निवडुंगाचा नको!

**महाबळ :** यंदा निवडुंगाचा दुष्काळ आहे म्हणे! आमच्या शंख-ध्वनींत बातमी आल्यासारखं वाटतंय !

**भगवन्त० :** तुमच्या 'शंखध्वनीत' वाचलंत ? काय ? निवडुंगाच दुष्काळ ? मग खास बेलफळांचा दुष्काळ असेल !

**भामिनी :** चार महिन्यांपूर्वीच मी निवडुंगं घेऊन ठेविलीं आहेत. ते कांहीं नाही. आतां तुम्हांला मीं वाढीन तें निमूटपणें खाल्लच पाहिजे सोपाना वरच्या खोलींतल्या टेबलावर पिवळं पुस्तक आहे तेवढं घेऊन ये बरं

**चंचला :** कसलं पुस्तक ? रस्सा कसा करावा यावर एकादं पुस्तक आहे वाटतं ?

**भामिनी :** पुस्तकाचं नांव आहे 'शेलकीं पक्वान्नं !

**भगवन्त :** राम, राम ! छापण्याची कला एका पुरुषानें शोधून काढलं त्याचं प्रायश्चित्त आम्ही बाकीचे पुरुष भोगतों आहोंत ! महाबळ, घ्य देवाचं नांव आणि करा मनाची तयारी. कुणाच्या ताटांत काय वाढू ठेवलं आहे याची त्या बिचाऱ्याला कल्पना नसते हेंच खरं !

(सोपाना पुस्तक आणून देतो.)

**भामिनी** (पुस्तक वाचीत): 'अच्छेर निवडुंगाचीं चांगलीं कांटेरी बोंडें घ्यावीं' (जाते).

**सर्वजण** (अंगावर शहारे आल्यासारखं करून): अरे बापरे—का हें भगवन्तराव? हीं कांटेरी बोंडं—

**भगवन्त० :** कांटेरी बोंडं ? हूं ! हाच आमचा 'छापील संसार.' ! !